कै. अण्णा किर्लोस्करकृत

# संगीत शाकुंतल नाटक.

**श्रीमहाकवि कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतल**
नाटकाचें गद्यपद्यात्मक मराठी भाषांतर.



**नवी आवृत्ति.**



पुणें पेठ भांबुर्डा घ.नं. १३६।२ येथें
**आर्यभूषण** छापखान्यांत **अनंत विनायक पटवर्धन**
यांनीं छापून प्रसिद्ध केलें.







१९३०

किंमत ~~एक~~ ॥ रुपाया.

अभिज्ञानशाकुंतल नाटकाचे परम रसिक व मर्मज्ञ

**ती० रा० रा० पांडुरंगराव तात्या किर्लोस्कर**

यांस

पितृभक्तिपुरःसर

हा ग्रंथ त्यांच्या चिरंजिवानें

**अर्पण**

केला आहे.

**बळवंत पांडुरंग किर्लोस्कर**

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.

श्रीमहाकवि **कालिदास** याच्या संस्कृत ग्रंथांची माहिती ज्यांना अजून झाली नाहीं असे लोक फार थोडे सांपडतील. ह्या ग्रंथांचीं निरनिराळया भाषेंत भाषांतरें होऊन कवीच्या गुणांचा घोष सर्व देशांत आबालवृद्धांच्या तोंडीं ऐकूं येऊं लागला आहे. **कालिदासानें** केलेल्या, निदान आजपर्यंत तरी उपलब्ध असलेल्या—तीन नाटकांपैकीं **अभिज्ञानशाकुंतल** हें नाटक फारच चांगलें साधलें आहे, असें सर्वांचें मत आहे. बाकीचीं **विक्रमोर्वशीय** व **मालविकाग्निमित्र** हीं दोन नाटकें चांगलीं तर आहेतच, परंतु **शाकुंतला**च्या मानानें पाहतां त्यांची योग्यता कमी पडते. **कालिदासा**ची कवित्वशक्ति जेव्हां पूर्ण विकास पावली नव्हती व कशालाही न भितां प्रसंगविशेषीं थेट अस्मानपर्यंत भरारी मारण्याची कला जेव्हां त्याच्या कल्पनाशक्तीला साधली नव्हती अशा वेळीं वरील दोन नाटकें त्यानें लिहिलीं असावीं असा पुष्कळ विद्वान् लोकांचा अभिप्राय आहे; व तो अभिप्राय या दोन ग्रंथांच्या अन्तःस्वरूपावरून पुष्कळ अंशीं खरा ठरतो. अलीकडे इंग्रजी विद्येचा प्रसार आपल्या देशांत झाल्यापासून, व संस्कृत भाषा पाठशालांत शिकविण्याचा प्रघात पडल्यापासून संस्कृत ग्रंथकारांचीं पुस्तकें लोकांना विशेष माहीत होत चाललीं आहेत. **सर वुइल्यम् जोन्स्** यांना संस्कृत भाषेचा नाद असल्यामुळें त्यांनीं सुमारें ६०—७० वर्षांपूर्वीं **शाकुंतल** या नांवाच्या नाटकांत काय मजा आहे तें आपल्या देशबंधूंना कळवून दिलें. त्यावेळीं संस्कृत चांगलें जाणणारे असे इंग्रज लोक या देशांत फारच थोडे होते; व **सर वुइल्यम** यांसही **कालिदासाच्या** सर्व खुब्या कळल्या असतील कीं नाहीं याची मोठीच शंका आहे. तथापि त्यांनीं केलेल्या भाषांतरावरून परद्वीपस्थ लोक या

पुस्तकावर इतके खूष झाले कीं, लौकरच **शाकुंतल** नाटकाचीं दुसऱ्या बऱ्याच भाषांतून भाषांतरें झालीं; व सर्व कविवृंदाचा मुकुटमणि होऊन बसलेला जो विख्यात **शेक्सपियर** त्याच्याशीं **कालिदासाची** लोक तुलना करूं लागले; व '**कालिदास** हा हिंदुस्थानांतील **शेक्सपियर** असें समजलें पाहिजे,' असा सर्वांचा अभिप्राय ठरला. 'शैवालें युक्त जैसें पंकज तें शोभतें' या **कालिदासोक्त** न्यायानेंच **सर वुइल्यम** यांनीं जरी कसें तरी **शाकुंतलाचें** भाषांतर केलें होतें तरी तितक्यानेंच **कालिदासाची** विशाल कवित्वशक्ति त्यांच्या देशबंधूंना कळून सर्व सहृदय वाचकांच्या वृत्ति आनंदमय झाल्या. विख्यात कवि **गेटी** तर 'मधुर गायनाच्या नादीं वेडावुनि (तो) गेला,' त्यामुळें या नाटकाविषयीं लिहितांना त्यानें अतिशय रमणीय पदार्थांचें अग्रस्थान **शाकुंतलाला** दिलें. "जर तुम्हांला कोकिलरवांनीं रमणीय भासणाऱ्या व आपल्या आल्हादकारक वस्तूंनीं सगळ्या लोकांचें मन मोहून टाकणाऱ्या वसंतसमयाची गोडी घ्यावयाची असेल किंवा रमणीयतेचा अतिशय पाहिजे असेल तर **शकुंतला** घ्या म्हणजे सर्व मिळाल्यासारखें होईल;" ही अव्वल इंग्रजीच्या वेळची संस्कृत भाषेची स्थिति होय. पुढें युरोपियन लोकांसही ती प्रत्यक्षरूपानें जसजशी जास्त कळूं लागली, तसतशी **कालिदासाच्या** अप्रतिम कवित्वाची परीक्षा चांगली होऊं लागून त्याच्या गुणांचा महिमा जास्तच होत चालला आहे, तर अशा सर्व विख्यात कवीच्या सर्वमान्य नाटकाचें भाषांतर करण्याचें रा० **किर्लोस्कर** यांनीं मनांत आणिलें हें एक त्यांचें पुस्तक वाखाणलें जाण्यास प्रधान कारण होय.

**शाकुंतल** नाटकाचीं भाषांतरें अनेक भाषांतून झालीं आहेत; खुद्द मराठींतच दोन तीन झालीं आहेत; पण रा० **अण्णा किर्लोस्कर** यांनीं भाषांतराचा जो प्रकार काढला तो पूर्वींच्याहून भिन्न आहे; त्यांनीं इंग्रजींत जसे 'ऑपेरा' असतात तशा प्रकारचें **संगीतबद्ध**

**शाकुंतलाचें** भाषांतर केलें व त्याचे प्रयोग येथील व इतर गांवच्या लोकांना त्यांनीं अनेक वेळां करून दाखविले. रा० **किर्लोस्कर** यांच्या भाषांतरामध्यें जरी कांहीं चुका असल्या तरी **कालिदासाच्या** रसाळ वाणीचा दुसऱ्या परंतु चारुतर रूपानें सर्व जनांना त्यांनीं आस्वाद करून दिला, व मराठी भाषेंतील नाटकांत आजपर्यंत फारसा उपयोगांत नसलेला रागबद्ध संगीताचा प्रकार त्यांनीं प्रचारांत आणिला, याबद्दल त्यांचे सर्वांनीं आभार मानले पाहिजेत.

आतां खुद्द **संगीत शाकुंतल** नाटकाकडे वळूं. **शाकुंतल** नाटकाचें संविधानक फार सोपें असून मनोवेधक आहे. **भारतांतील** कथेंत असें आहे कीं, जेव्हां **राजानें शकुंतलेचा** अव्हेर केला व मुलासमवेत ती आली असून तिला आपल्या घरांत घेतलें नाहीं तेव्हां आकाशवाणी झाली, त्यावरून **राजानें** आपल्या प्रियेस घरांत घेतलें. या साध्या कथाभागांत फारशी खुबी नाहीं, म्हणून **कालिदासानें दुर्वासऋषीचा** शाप व आंगठी नाहींशी होणें या दोन गोष्टी आपल्या अप्रतिम कल्पना-शक्तीच्या योगानें नाटकाच्या संविधानकांत नवीन घातल्या आणि त्यामुळें नाटकाला इतकी शोभा व मनोवेधकता आली आहे कीं, ' काव्येषु नाटकं रम्यं तत्रापिच शकुन्तला " या उक्तीची सर्वांशीं सार्थकता होते. म्हणून **संगीत शाकुंतल** पुस्तकाच्या संविधानकासंबंधानें फार लिहिणें नको. **कालिदास** हा तर कविश्रेष्ठ व रा० **किर्लोस्कर** हे संगीतकलेंतील मार्मिक, तेव्हां गुणद्वय एकत्र जमल्यावर नाटक वाईट व्हावें कसें ? या नाटकांत सर्वच चांगलें जमलें आहे. मूळचा कथाभाग चांगला, पद्यरचना सुगम व राग फार गोड व त्या त्या रसाला योग्य; आणि सगळ्यांत विशेष गोष्ट ही कीं, ' संगीत ' नाटकाचा प्रकार पहिल्यानें या नाटकानेंच लोकांना दाखविला. तेव्हां :—

**वस्त्वेकैकमपीह वाञ्छितफलप्राप्तेः पदं किं पुनर्मद्भाग्योपचयादयः समुदितः सर्वो गुणानां गणः '**

या रत्नावली नाटकांतील सूत्रधारोक्तीची कोणाला आठवण होणार नाहीं ? पद्यें वाचतांना संगीतानभिज्ञ मनुष्याला यतिभंग झाल्याचें बऱ्याच ठिकाणीं आढळून येईल. वास्तविक पाहतां तालसुरादींचा उपयोग न करतां जर पद्यें साध्या कवितेसारखीं वाचूं लागलों तर बऱ्याच स्थलीं यतिभंग होतो; पण तींच पद्यें प्रयोग करतांना तालसुरावर म्हटलीं म्हणजे तो दोष बहुतकरून दृष्टीस पडत नाहीं. **संगीत शाकुंतल** हें पुस्तक जरी **आर्यभूषण** छापखान्याचें आहे तरी त्यांत मूळ ग्रंथकाराच्या भाषासरणींत किंवा शब्दरचनेंत आमच्यानें फेरबदल करवत नाहीं, हें लक्षांत आणून मूळची भाषा फारशी न बदलतां पूर्वींचे यतिभंग जितके दुरुस्त करतां आले तितके केले आहेत.

प्रकाशक.

---

# नव्या आवृत्तीचा विशेष.

[ Resumed we what adorned King Bhoja's court,
The fame of Kalidas and wits resort. ]*

सन १८८० सालीं ता. ३१ आक्टोबर रोजीं पुण्याच्या रंगभूमीवर महाकवि कालिदासाची अभिनव कृति अभिज्ञान **शाकुंतल**–संगीत-रूपानें पुन्हां अवतरली. त्यावेळीं भोजराजाची सभा हा प्रयोग पाहण्यास प्रत्यक्ष नव्हती; परंतु त्याच्या सभेंत त्या वेळीं जीं विद्वद्रत्नें होतीं, त्याप्रमाणें वरील प्रसंगीं पुणें शहरांतील "सकलकलागुणवेत्ते पंडित" रंगसभेंत जमले होते. प्रत्यक्ष कालिदासाच्या वेळेच्या नटवर्गाचा इतिहास इतक्या शतकांनंतर उपलब्ध असणें शक्य नाहीं; परंतु आद्यसंगीत नाटकाचे कर्ते अण्णासाहेब किर्लोस्कर यांचा नटवर्ग, गायन व अभिनय या गुणांनीं इतका कुशल होता कीं, **किर्लोस्कर** यांचें कवित्व व नटांचें नाट्यनैपुण्य महाराष्ट्रभाषेच्या नाट्यकलेच्या इतिहासांत अजरामर होऊन बसलें आहे. प्रस्तुत आवृत्तींत जी सुधारणा केली आहे ती **शाकुंतल** नाटकांतील तत्कालीन प्रयोगांतील दुष्यंत, कण्व, शकुंतला इत्यादि नटांचे प्रत्यक्ष व भूमिकांचे फोटो दिले आहेत. या नटांना प्रत्यक्ष ज्यांनीं पाहिलें नाहीं, त्यांना व भावी पिढ्यांना या फोटोंचें इतिहासदृष्ट्या महत्त्व वाटेल यांत शंका नाहीं. **अभिज्ञान शाकुंतल** नाटकाची थोरवी परद्वीपस्थ पंडितांना मान्य झाली आहे. परंतु त्याची अधिक योग्यता **किर्लोस्करांच्या** समकालीन नटांनीं प्रयोगरूपानें महाराष्ट्रीयांच्या प्रत्ययास आणून दिली आहे.

* कॉलेजमधून संस्कृत नाटकाचे प्रयोग करण्याचा प्रघात सुरू झाला, त्यावेळीं "प्रलोग" व "एपिलोग" नाटकारंभीं व शेवटीं बोलण्यांत येऊं लागले. सन १८७१ सालीं डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं **वेणीसंहार** नाटकाचा प्रयोग केला. त्यावेळीं के. कृष्णाजी परशराम गाडगीळ यांनीं जो "एपिलोग" म्हटला त्यांतील वरील अवतरण आहे.

महाकवींच्या नाटकांची थोरवी त्या योग्यतेचे नट दाखवीत असतात. शेक्सपीयरच्या नाटकांचाही असाच प्रकार झाला आहे. त्याची खरी योग्यता त्याच्या नाटकाच्या यथार्थ नाट्यदर्शनानेंच इंग्लिश रंगभूमीला अवगत झाली. **शेक्सपीयर**नंतर थोड्याच दिवसांनीं **बेटर्टन** नांवाचा एक अद्वितीय नट होऊन गेला (१६३५—१७१० ). इंग्लिश रंगभूमीवर त्याच्यानंतर एका **ग्यारीक**नेंच इतिहासांत नांव मिळविलें. या दोघांच्याही नाट्याच्या अनेक दंतकथा मागें राहिल्या आहेत. शेक्सपीयरचा खरा प्रकाश या दोघांनींच रंगभूमीवर पाडला. नाट्यकलेच्या सुदैवानें किर्लोस्करांची श्रेष्ठता दाखविण्याला **मोरोबा, बाळकोबा** व **भाऊराव** यांचें कर्णमधुर गायन व अर्थद्योतक अभिनय कारणीभूत झाले व यांच्यामुळेंच किर्लोस्करांनीं नवें नाट्ययुग सुरू केलें असा लौकिक किर्लोस्कर यांचा झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रस्तुतच्या आवृत्तींत दुसरा एक फरक केला आहे. तो हा कीं, अव्वल प्रतींतील शब्दरचना, व पद्यरचना, यांत त्यानंतरच्या प्रतींत फेरफार केलेले होते—ते पुन्हां किर्लोस्करांच्या अव्वल प्रतीप्रमाणें दुरुस्त केले आहेत. याचें कारण किर्लोस्करानीं शाकुंतलाचें जें भाषांतर केलें होतें तें प्रयोगाकरितां होतें. त्यामुळें त्यांत जी शब्द व वाक्यरचना होती ती पात्रानुरोधानें केली होती. किर्लोस्करानीं शब्दशः म्हणून भाषांतर केलें नव्हतें. शिवाय भाषेच्या दृष्टीनें जें योग्य दिसेल तेंच वाक्य व शब्द त्यानीं घातले होते. हें करतांना त्यानीं अर्थहानि बिलकूल होऊं दिली नव्हती. **आर्यभूषण** प्रतींत आजपर्यंत जे फेरफार केलेले होते ते फक्त पुस्तकापुरतेच राहिले. रंगभूमीवर किर्लोस्करांच्याच वाक्यांचा, शब्दांचा उपयोग होत होता. संगीत हें जसें रागबद्ध व तालबद्ध असतें, तसें गद्यभागालाही स्वरभेद, व वाक्यावर किंवा शब्दावर अवसान हें असतें. या दृष्टीनें किर्लोस्करांचीच भाषा सरस ठरते. पुढें भाषेच्या दृष्टीनें कसे फेरफार होतात याबद्दल दुसऱ्यांनीं केलेल्या शाकुंतलाच्या भाषांतरांचीं उदाहरणें दिलीं आहेत, हीं पाहिलीं असतां प्रयोगदृष्ट्या कोणती भाषा योग्य आहे हें समजून येईल.

शकुंतला सख्यांसह प्रवेश करते तो प्रसंग. अंक १ ला:

शकुंतला सख्यांना हांक मारते— ( संस्कृत ) " इत इतः सख्यौ"

याचें भाषांतर तीन ग्रंथकारांनीं तीन प्रकारांनीं केलें आहे. प्रो. लक्ष्मणशास्त्री लेलेः— " सख्यांनो, इकडे इकडे या अशा. "

रा. रा. के. वि. गोडबोलेः— " इकडून इकडून ग सख्यांनो. "

आर्यभूषणप्रतः— " सख्यांनो चला इकडे या. "

किर्लोस्करांच्या वेळीं शकुंतला बोलत होती तें वाक्यः—"सख्यांनो इकडे याग इकडे या. "

शकुंतला व सख्या झाडांना पाणी घालतांना इतस्ततः हिंडत आहेत, ही कल्पना केली म्हणजे शकुंतला दोघी सख्यांपासून कांहीं अंतरावर गेली असून ती तेथून सख्यांस "इकडे याग इकडे या" म्हणून हांक मारते आहे ही कल्पना बरोबर वाटते.

( प्रसंग ) शकुंतलेच्या वल्कलाच्या चोळीची गांठ प्रियंवदेनें घट्ट बांधल्यामुळें ती जखडल्यासारखी झाली होती. ती गांठ सैल करण्यास तिनें अनसूयेस सांगितल्यावरून प्रियंवदा ह्मणते:—

संस्कृत:—"अत्र पयोधरविस्तारयितृ आत्मनो यौवनमुपालभस्व."

प्रो० लेले यांची प्रियंवदा या ठिकाणीं म्हणते: " मलाग बाई कां दोष देतेस याचा ? आपल्या अंगांत मुसमुसणाऱ्या तारुण्याला बोल लाव कीं ! "

रा० रा० के. वि. गोडबोले यांची प्रियंवदा म्हणते: " ( हंसत ) याबद्दल **स्तन** पोसविणाऱ्या तारुण्याला दोष लाव ! मला कां बाई उगीच ? "

आतां किर्लोस्करांची प्रियवंदा काय म्हणते ती पहा:—"( हंसत ) सखे, तुझें तारुण्य घटकोघटकीं, तुझ्या अवयवांस वाढवीत आहे, म्हणून ही वल्कलाची चोळी अखळ झाली असेल, तर त्या यौवनावर रागाव मज गरिबावरग कां ? "

रा० गोडबोले यांनीं **पयोधर** याचें शब्दशः "स्तन" असें भाषांतर करून तें प्रियंवदेच्या तोंडीं घातलें आहे. प्रियंवदेसारख्या तरुण मुलीच्या तोंडीं इतक्या उत्तान अर्थाचे शब्द असावयाचे नाहींत. यापेक्षां किर्लोस्करांच्या शब्दांत " तुझें तारुण्य घटकोघटकीं तुझ्या अवयवांस वाढवीत आहे— " या वाक्यांत किती तरी अर्थ भरला आहे ? मुलीच्या तोंडीं शोभण्यासारखें तें वाक्य आहे. कै० देवलांनीं या ठिकाणीं पुढील पद केलें आहे:

**उगिच कांगे दोष मला देसी ।**

**वाढवी अवयव यौवन ह्मणुनी कंचुकी रुतली अशी ॥**

हें पद प्रस्तुत प्रतींत योग्य ठिकाणीं घालावयाचें विस्मरणानें राहून गेलें. हें पद किती साधें व अर्थपूर्ण आहे ?

किर्लोस्करांची शब्दयोजना मार्मिक असते. याचें पुढील उदाहरण घेण्यासारखें आहे, दुष्यंताच्या तोंडचें पद "बायांनो द्या सोडोनी" यांतील चरण "**स्वासानें उर थरथरलें** अद्यापि किती तरी हालें" हें मूळच्या—

अद्यापि **स्तन**वेपथुं जनयति श्वासः प्रमाणाधिकः।

या चरणाचें भाषांतर आहे. किर्लोस्करानीं या ठिकाणीं प्रौढ वाक्याची योजना करून मार्मिकपणा दाखविला आहे. प्रो. लेले यांनीं " स्तन " शब्दाच्या ऐवजीं " वक्षस्थळ " हा शब्द योजला आहे. तो कांहींतरी बरा आहे. परंतु रा. गोडबोले यांनीं आपल्या भाषांतरांत " स्तन पहा अद्यापिही कांपती" असें स्पष्ट म्हटलें आहे. तरुण मुलींशीं बोलतांना या शब्दाचा उपयोग सभ्य पुरुष कधींही करणार नाहीं. ही गोष्ट गोडबोले विसरल्यासारखें दिसतें. शाकुंतलांत किर्लोस्करानीं एका ठिकाणीं मात्र " स्तन " या शब्दाचा उपयोग केला आहे, आणि तो सहाव्या अंकांत विदूषकाला चित्रांतील उणीवा राहिल्या आहेत त्या सांगतांना. तेथें ते लिहितातः—

"न काढीली **स्तनदेशिं** रहायाची धवलचंद्रापरि माळ मृणालांची " या दिंडींत सदर शब्दाचा जो उपयोग केला आहे तो योग्य स्थळींच केला आहे.

पद्यांत **आर्यभूषण**छापखान्याच्या आजपर्यंतच्या प्रतींत किर्लोस्करांच्या शब्दांच्या जागीं दुसरे शब्द घातलेले होते, परंतु या प्रतींत

प्रकाशकांच्याच इच्छेवरून मूळचे शब्द पुन्हां घातले आहेत. किर्लोस्करांची मूळची पद्यरचना रसाळ व पात्रांना गातांना सुलभ अशी होती. **आर्यभूषण** छापखान्याच्या पूर्वींच्या प्रतींत श्लोकांचें शब्दशः भाषांतर करण्याचा प्रयत्न केल्यामुळें तीं पद्यें म्हणतांना क्लिष्ट वाटतात. याचीं एक दोन उदाहरणें देतों:—

अंक २ रा. दुष्यंताच्या:

" काय परम रमणीय सखीचें रूप कथूं तुजला।
ब्रह्मदेव अधिं सुंदर चित्रीं हात वळवि आपुला ।
मग बनवी हें रत्न विलक्षण ऐसें वाटे माझ्या मतिला॥ "

ही या पद्याची किर्लोस्करांची साधी व आटोपसर अशी शब्द-रचना आहे; परंतु आर्यभूषण प्रतींत फेरफार केलेला होता तो:—

" ब्रह्मदेव आधिं सुंदर **तनुची मूस मनीं** ओती।
**मग बनवी स्त्री सृष्टिची नूतन, काया ऐशी वाटे हो ती**॥ "

असा होता. या शब्दांच्या फेरफारानें पात्रास पद सहज म्हणतां येण्यासारखें नाहीं.

अंक २ रा:— " नाहीं कोणीही हुंगीलें "

या पद्यांत किर्लोस्करांची शब्द योजना खालीलप्रमाणें होती.—

" नाहीं ज्यावरी घर्षण घडलें ऐसें मुक्तारत्नचि दिसलें "

या ठिकाणीं पूर्वींच्या **आर्यभूषण**प्रतींत:—

" **नाहीं ज्याला वेज पाडिलें** " असा पाठभेद होता. परंतु हा पाठ गातांना तोंडांत बरोबर बसत नाहीं. पूर्वींच्या प्रतींत असे जे कांहीं वाक्यांचे व पद्यांचे मूळ संस्कृताला धरून फेरफार केले आहेत ते भाषांतरदृष्टीनें बरोबर असले तरी प्रयोगांत पात्राच्या तोंडीं बरोबर बसत नाहींत. पद्यरचनेच्या दृष्टीनें किर्लोस्करांचें **शाकुंतल** सरस आहेच; परंतु भाषेच्या दृष्टीनेंही तें सरस ठरेल. पात्राच्या योग्यते-प्रमाणें त्यांनीं शब्दाची व वाक्याची योजना केली आहे, याचीं मागें उदाहरणें दिलीं आहेत; परंतु आणखी एक दोन उदाहरणें वरील म्हणणें पटण्याकरितां पुढें देत आहें:—

अंक ४ था अनसूयेचा प्रवेश—अनसूया म्हणतेः—" मला मेलें **विषयासंबंधीं** गोष्टींचें वारें देखील नाहीं खरें. पण ह्या राजानें शकुंतलेशीं कपट केलें हें समजत नाहीं असें नाहीं.—पण आतां हें समजून तरी मी काय करणार? **आतां या मदनाची तरी हौस पुरो, या मेल्यानेंच** ( मदनानें ) माझी सखी शकुंतला निर्मळ अंतःकरणाची असून तिला या कपटी राजावर विश्वास ठेवायला लावलें. " हीं वाक्यें अनसूयेच्या तोंडीं पूर्वीच्या प्रतींत आहेत. या ठिकाणीं किर्लोस्करांच्या पहिल्या प्रतींत व प्रयोगांत—पुढील वाक्यें होतीं: " मला **संसारांतलें** कांहीं कळत नाहीं खरें, पण त्या राजानें शकुंतलेशीं **वाईट आचरण** केलें हें समजत नाहीं असें नाहीं— पण आतां हें समजून काय उपयोग?... **आतां दैवावरच हवाला घातला पाहिजे. गरीब बिचारी** निर्मळ अंतःकरणाची माझी मैत्रीण शंकुतला, **या मेल्या दैवानेंच** तिला ह्या कपटी राजावर विश्वास ठेवायला लावलें. "

अनसूयेसारख्या अजाण व भोळसर मुलीच्या तोंडीं संसारी माणसं जशी भाषा बोलतात तशीच असावयाची. अण्णासाहेबांच्या भाषांतरांत प्रत्येक शब्द व वाक्य भाषेला धरून व विचाराला धरून घातलेलें आहे.\

अंक ३ मध्यें शकुंतला मदनबाधेनें विव्हळ असतां तिच्या दुखण्याची चिकित्सा करतांना अनसूया म्हणतेः—" गडे शकुंतले, ती मदनबाधा कीं काय म्हणतात कीं नाहीं, तिच्यापासून काय होतें तें कांहीं मला ठाऊक नाहीं; पण कथापुराणांतल्या असल्या गोष्टी आम्हीं ऐकल्या आहेत, तशी बाई तुझी अवस्था झाल्यासारखी दिसते. तर गडे सांग तुला काय होतें तें—रोगाची परीक्षा चांगली झाली नाहीं तर औषध तरी कसलें द्यावें? " मुलीच्या तोंडीं शोभण्यासारखें व मैत्रिणीविषयीं अंतःकरणाच्या सच्या कळवळ्याचेंच हें भाषण आहे.

रा. के. वि. गोडबोले यांचें भाषांतर या ठिकाणीं असें आहेः—

**" गडे शकुंतले, प्रेमविषयक गोष्टींत आम्हांला दोघींनाही खरें म्हटलें तर कांहीं कळत नाहीं. पण गतकालीन गोष्टींच्या पुस्तकांतून जी प्रेमी जनाची स्थिति ऐकण्यांत येते तशी तुझी अवस्था झालेली मला दिसत आहे. तर सांग बरें, कशामुळें तुला हा त्रास होत आहे तें ? कारण, विकाराचें निदान बरोबर झाल्याखेरीज उपाययोजना अशक्य असते."**

किर्लोस्करांच्या भाषेंत व गोडबोले यांच्या भाषेंत केवढा फरक दिसतो. किर्लोस्करांचें भाषांतर रंगभूमीकरितां आहे हें जरी खरें आहे तरी मूळ **शाकुंतलाचें** स्वारस्य कोठेंही गेलें नाहीं. इतकेंच नाहीं तर खऱ्या मराठी भाषेनें तें बरोबर उतरलें आहे. तिन्ही भाषांतरांची तुलना करून आम्हीं पाहिली, परंतु त्यांत मूळची अर्थहानि झाल्याचें कोठेंहि किर्लोस्करांच्या भाषांतरांत दिसत नाहीं. इतकें खरें कीं, किर्लोस्करांनीं संस्कृत शब्दाला प्रतिशब्द, तो वाक्यांत अगर पद्यांत बरोबर शोभो अगर न शोभो तो आपल्या भाषांतरांत दिला नाहीं. परशुरामपंत तात्यांनीं आपल्या शाकुंतलाच्या भाषांतराच्या प्रस्तावनेंत जें म्हटलें आहे कीं "मूळ संस्कृत ग्रंथाचें हें भाषांतर असें म्हटलें आहे; परंतु केवळ शब्दास शब्द असें नाहीं. क्वचित् स्थळीं न्यूनाधिक्य केलें आहे."

अण्णासाहेबांनीं आपल्या शाकुंतलांत वरीलच तारतम्य दाखविलें आहे. एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत रूपांतर करतांना त्या भाषेची सरणी भाषांतरांत ठेवली म्हणजे वाचकांना ती दुर्बोध किंवा क्लिष्ट वाटत नाहीं. मराठींत चांगलीं अशीं जीं रूपांतरें झालीं आहेत तीं इंग्रजींतून कर्त्यांनीं भाषांतरकरण्याचे वेळीं मराठी भाषेकडेच लक्ष दिलें आहे. या विधानाची सत्यता पाहणें असेल तर कै० कीर्तने यांचें "जयपाळ" व अण्णासाहेब महाजनी यांचें " तारा " नाटक पाहिलें असतां या म्हणण्याची सत्यता दिसून येईल. किर्लोस्करांनीं भाषांतरच केलें आहे, परंतु मुळांतील स्वारस्य व अर्थहानि कोठेंही होऊं दिली नाहीं. इतकेंच नाहीं तर दुष्यंत व कण्व यांचीं सहाव्या व चौथ्या अंकांतील पद्यें म्हणतांना **वाघोलीकर** व **नाटेकर** मूर्तिमंत करुणरस बठवीत असत. स्थलाभावामुळें त्या पद्यांचा नुसता नामनिर्देश करण्यापलीकडे कांहीं करतां येत नाहीं. परंतु जे श्लोक पंडितांनीं शाकुंतल-

मध्यें श्रेष्ठ प्रतीचें म्हणून ठरविले आहेत त्यांचें भाषांतर पद्यांत इतकें उत्कृष्ट साधलें आहे कीं, तीं पद्यें ऐकून प्रेक्षकवर्ग तल्लीन होऊन जात असे. दुष्यंताचीं " बघिन स्वप्निं जरि तिला नये झोंप कधिं मला, " " उभि जवळ खरी ती बाला, " " स्वर्गीं सर्व पितर माझे ते " हीं पद्यें व कण्वाचीं " " जाते कीं मम शकुंतला, " " जाईल कैसा तनये शोक मनाचा " व "परक्याचें धन कन्या तें त्या देउनि आज मि सुटलों " हीं पद्यें म्हणतांना जणूं काय तीं पात्रें मूर्तिमंत पुढें उभीं असून शकुंतला-वियोगाचा खरा प्रसंग आपणापुढें आहे असा भास होत असे.

**संगीत शाकुंतल** नाटकाचा योगायोग कांहीं अपूर्व घडून आला होता. शाकुंतलसारखें नाटक, किर्लोस्करांची सुरस पद्यरचना, प्रेक्षकवर्ग सहृदय व नटवर्ग अप्रतिम इतक्या गोष्टी एकसमयावच्छेदानें जुळून आल्यावर सन १८८० हें वर्ष नाट्यकलेच्या इतिहासांत " न भूतो न भविष्यति " असें होऊन गेलें म्हणून या वेळेचे प्रयोग पाहणारे लोक म्हणत आहेत तें वृथा नाहीं.

**नव्या आवृत्तींतील विशेष** काय, यासंबंधानें विवेचन करतांना मूळच्या पाठांची नव्या आवृत्तींत अवश्यकता दिसून येईल. **शेक्स-पीयरच्या** नाटकांतील असेच फेरफार त्याच्या नंतरच्या प्रकाशकांनीं व नटांनीं मनासारखे केले आहेत—परंतु इतिहाससंशोधकांनीं— खुद्द शेक्सपीयरच्या अव्वल प्रतीचे पाठ संशोधन करून प्रकाशित केले आहेत. किर्लोस्करांची अव्वल प्रत दुर्दैवानें आतां दुर्मिळ झाली आहे, तेव्हां स्मरणानें व कांहीं किर्लोस्कर मंडळींतील तत्कालीन नटांच्या स्मृतीनं जेवढे पूर्वपरिचित शब्द व वाक्यें या प्रतींत दुरुस्त करतां आलीं तितकीं केलीं आहेत. विशेष गोष्ट ही कीं, **आर्यभूषणच्या** मालकांनीं पूर्वस्वरूपांत **संगीत शाकुंतल** छापण्याचें मनावर घेतलें यामुळें ही आवृत्ति संस्मरणीय होईल अशी आशा आहे.

चाळीस वर्षांच्या अवधींत संगीत शाकुंतल नाटकाच्या पांच पंचवीस आवृत्त्या व प्रती निदान लाख दीड लाख तरी निघाल्या असतील. मराठी भाषेंत प्रसिद्धीचा एवढा मान संगीत **शाकुंतल** या नाटकालाच आहे यांत शंका नाहीं.

पुणें, ता. १५-१२-२९. **शं. बा. मुजूमदार.**



रा. रा. त्र्यंबक नारायण साठे.

किर्लोस्कर मंडळीचे पहिले सेक्रेटरी.

गंधर्व संगीत मंडळीचे पहिले मॅनेजर.

मिरज सिटी म्युनिसिपॅलिटीचे सेक्रेटरी, रिटायर्ड मामलेदार व मॅजिस्ट्रेट सं० जमखंडी, रिटायर्ड कारभारी राजे घाटगे इस्टेट, जि. सातारा.

# उपोद्धात

## पूर्वपीठिका व आख्यायिका.

लेखकः- **रा. त्रिंबक नारायण साठे.**

महाराष्ट्र संगीत नाट्यकलेचे जनक कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं सन १८८० इ. सालीं कविकुलगुरु कालिदास यांच्या 'अभिज्ञान शाकुंतल' नाटकाचें "संगीत शाकुंतल" या नांवाचें भाषांतर करून नाट्यकलेला नाकें मुरडणाऱ्या संगीतलोलुप महाराष्ट्र वाचकांस उपकृत करून ठेविलें त्यास आज ४९ वर्षें झालीं. या पुस्तकाच्या जन्माचा इतिहास पूर्वी बऱ्याच लोकांस अवगत होता; परंतु त्यांपैकीं फार मोठा समुदाय कालक्रमानें कालवश झाल्यानें जे थोडे जीव धरून उरले आहेत, त्यांपैकीं हा लेखक एक आहे. "संगीत शाकुंतल" नाटकाच्या आतांपर्यंत अनेक आवृत्त्या छापून निघाल्या व हजारों प्रती लोकांच्या हातीं पडल्या व त्या लाखों लोकांनीं वाचल्याही आहेत. परंतु त्यांमध्यें आरंभींच्या आख्यायिका प्रसिद्ध झालेल्या नाहींत; त्या या आवृत्तीमध्यें प्रसिद्ध व्हाव्यात या हेतूनें त्या लिहून काढाव्यात अशी **आर्यभूषण** छापखान्याच्या चालकवर्गापैकीं माझे जुने स्नेही रा. रा. अनंत विनायक ऊर्फ वामनराव पटवर्धन यांची प्रेमाची सूचना झाली. त्यावेळीं मी त्यांस कोणच्या आख्यायिका काय हेतूनें प्रसिद्ध होणें जरूर आहे त्याची त्रोटक माहिती सांगितली त्यावरून त्यांनीं त्या वेळच्या संगीत नाटकाचा इतिहास काय आहे, नाटकांत भूमिका घेणारे विद्वान् पदवीधर कोण होते व ते सरकारी नोकरींत काय हुद्यावर होते आणि साह्यकारी बडी मंडळी कोण होती ही माहिती सुसंगत द्यावी असें सुचविलें त्याप्रमाणें एक टिप्पण तयार केलें आहे व ते या प्रस्तावनेच्या रूपानें प्रसिद्ध होत आहे. ही पुरवणी

प्रस्तावना स्मरणाप्रमाणें तयार केली आहे व ती त्या वेळच्या परमेश्वर-कृपेनें हयात असलेल्या दोन चार गृहस्थांच्या नजरेखालीं घातली आहे.

ज्यावेळीं कालिदासांनीं 'अभिज्ञान शाकुंतल' नाटक लिहिलें त्याकालीं त्याचे नाट्यप्रयोग त्या कालीन रंगभूमीवर होत असत हें प्रसिद्ध आहे. परंतु त्यावरून त्यावेळच्या प्रेक्षकांमध्यें सभापति कोण होते, भूपति कोण होते, त्याकालीं समकालीन कविवर्ग कोण होता, प्रेक्षक कोणत्या दर्जाचे होते, नाटकाचे प्रयोग राजाश्रयाखालीं प्रेक्षकांस, पंडितांस, आमंत्रण देऊन होत, किंवा त्या वेळच्या नाटक मंडळीस पारितोषकें देऊन करण्यांत येत, नटवर्गांत त्यावेळीं स्त्री व पुरुष पात्रांचीं कामें पुरुषच करीत कीं नटवर्ग स्त्रीपुरुष मिश्र असा होता याचा इतिहास आज कांहींच उपलब्ध नाहीं. फक्त ग्रंथआधारापलिकडे पुरावा नाहीं. हें न्यून लक्षांत घेऊन या प्रस्तावनेंत 'संगीत शाकुंतल' तयार झाल्यावर आरंभींच्या प्रसंगानुसार नट कोण होते, प्रेक्षक कोण होते, साह्यकारी कोण होते हा थोडासा उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे.

सन १८८० सालीं पुणें शहरीं इचलकरंजीकर नाटक मंडळीचे आनंदोद्भव नाटकगृहामध्यें गद्य प्रयोग सुरू झाले; त्यामध्यें कै० विष्णु मोरेश्वर ऊर्फ अण्णासाहेब महाजनीकृत 'तारा' नाटकाचे प्रयोग धूमधडा-क्यानें चालू होते. हा नाटकप्रयोग पहाणेस विद्वानांच्या झुंडी लोटत असत. त्यावेळच्या इचलकरंजीकर नाटकाचे मॅनेजर राघोपंत यांचा व अण्णासाहेबांचा दृढ परिचय होता. त्यांचे आमंत्रणावरून एका 'तारा' नाटकास दक्षिण भाग कमिशनरचे ऑफिसांतील मंडळीपैकीं नाना-साहेब सोमण, गंगाधरपंत जांभेकर बी. ए, बळवंतराव गोडबोले बी. ए., बापूसाहेब धारप बी. ए. वगैरे मंडळींसह अण्णासाहेब किर्लोस्कर हे आनंदोद्भव नाटकगृहांत गेले. हे जरा उशिरां गेल्यानें नाटकगृह प्रेक्षकांनीं चिकार भरलेलें पाहून ही सर्व मंडळी अप्पा बळवंताचे वाड्यालगत पूर्णानंद नांवाच्या नाटकगृहांत पारशी नाटक मंडळीचा 'इंद्रसभा' हा गद्यपद्यात्मक प्रयोग पहाणेस जाऊन बसली. त्यावेळीं अण्णासाहेबांचें मन पारशी नाटकांतील संगीत संचारानें बेधून गेलें आणि असें संगीतात्मक नाटक मराठी भाषेमध्यें केल्यास



तंबाखूआळींतील पुण्यांतील गुळवे हवेली ज्यांत कै० अण्णासाहेब किर्लो-
स्करानीं संगीत शाकुंतल लिहिलें व त्याची पहिली रंगाची तालीम
वरील हवेलीचे शेवटचे मजल्यावर केली ती जागा.

तें लोकाभिरुचीस प्रिय होईल काय या विचाराकडे लक्ष लागलें आणि 'शाकुंतला'चें भाषांतर गद्यपद्यात्मक करावें अशी मनःस्फूर्ति होऊन ते इंद्रसभा नाटक पाहून सर्व मंडळी बि-हार्डी आल्यावर किर्लोस्करांनीं नवीन कल्पना मंडळीपुढें मांडली; ती सर्वांस रुचली. नंतर बाकीची मंडळी झोंपी जाऊन किर्लोस्करांनीं दुसरे दिवशींच्या सुप्रभातसमयीं 'शाकुंतलाच्या' भाषांतरास सुरवात करून सूर्योदयापूर्वींच प्रथम अंकाचें नांदीपासून भाषांतर केलें; तें मंडळीस अत्यंत आवडलें. हें भाषांतर प्रथम चार अंकी तयार झालें. त्याचा जन्म ( आरंभ ) पुणें शहरीं तंबाखू आळींत पनवेलचे श्रीमंत व लोकप्रिय व्यापारी कै० विठोबा खंडापा गुळवे यांचे दुमजली हवेलीमध्यें झाला. तो ज्या हवेलींत झाला त्याचें छायाचित्र या पुस्तकांत दिलें आहे. या हवेलीचा वरचा भाग कै. गुळवे यांचे पेढीच्या वरचा मजला होता तो कै० गुळवे यांनीं कै. केरूनाना छत्रे यांनीं करून दिलेले नकाशाबरहुकूम बंगल्याचे धर्तीवर नवीन बांधला व त्यास विस्तृत असा मोठा दादर पूर्वेकडील गल्लीमधून घालून ही रम्य जागा त्या काळीं कै० गुळवे यांचे परमस्नेही कै० केरूनाना छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, शेट विष्णूदास गांधी, बाबा गोखले, आबासाहेब काथवटे, बापूसाहेब अकूत, रावसाहेब भाजेकर, नानासाहेब साठे, दफतरदार, विष्णु बाळकृष्ण सोवनी, बापूसाहेब बिनीवाले, अण्णासाहेब भिडे फ. स. ज. इत्यादि विद्वानांच्या सायंकाळच्या बैठकीची जागा होती. ही जागा पुढें बरींच वर्षे क्लबासारखी बैठकीची जागा चालू होती. पुढें कै० गुळवे यांनीं रविवार पेठेंत नवा वाडा बांधल्यावर ही जागा रिकामी पडली. कै० गुळवे यांनीं अण्णासाहेबांस राहणेस ती मोफत दिली होती. कै० गुळवे मार्मिक व रसिक असल्यानें या संगीत कलेकडे त्यांचें लक्ष वेधलें. त्याचा सुपरिणाम असा झाला कीं त्यावेळीं त्यांचेजवळ वाईचे रा. रा. मोरोबा वाघोलीकर म्हणून सुंदर चेहऱ्याचे, मनोहर व उठावदार गायन करणारे गवई होते. तेही कै० गुळव्यांबरोबर किर्लोस्करांकडे वरचेवर जात येत असत. ते दुष्यंतराजाची भूमिका घेण्यास सर्व प्रकारें पात्र असल्यानें त्यांची योजना किर्लोस्कर व गुळवे यांनीं दुष्यंताचे भूमिकेचे जागीं कायम केली. याचे पुढील भाग रा. रा. शं. बा. मुजुमदार कृत ' अण्णासाहेब किर्लो-

**स्कर'** यांचे चरित्रांतील रा. मुजुमदारांचे परवानगीनें पृष्ठ ६७ ते ७२ मध्यें प्रसिद्ध झालेला या खालीं दिला आहे.

" सन १८८० च्या सुमाराचा काल अशाच प्रकारचा महत्त्वाचा होता. या वेळीं महाराष्ट्रांतील **पुणें** व **मुंबई** शहरांत वक्तृत्व, लेखन, विद्वत्ता, मुत्सद्दीपणा, वैद्यक इत्यादि गुणांनीं प्रसिद्धीस आलेले पूर्वोक्त छत्रे, रानडे, **कुंटे**, चिपळूणकर, बापू मेहेंदळे, मंडलीक, तेलंग, आपटे हायकोर्ट वकील इत्यादि अलौकिक पुरुष महाराष्ट्रांतील बुद्धिमत्त्व दाखवीत होते. या वेळीं असाच एखादा बुद्धिमान् नाटककार उदयास येण्याची आवश्यकता होती; ती उणीव **अण्णा**साहेबांच्या योगानें भरून निघाली. यांच्या पूर्वीं महाराष्ट्रीय कवि व नाटककार कोणीं निपजला नव्हता. पारशी लोकांत मात्र **दादाभाई सोराबजी पटेल** एम्. ए. यांनीं इंग्रजी ऑपेराच्या धर्तीवर उर्दू भाषेंत गायनपद्धतीवर नाटकें सुरू करून नाच, देखावे, पडदे इत्यादि सामुग्रींनीं त्यांना चांगलें स्वरूप आणलें होतें. आमच्याकडे पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें फक्त पौराणिक व गद्य नाटकें प्रचारांत होतीं. परंतु त्यांत सुधारणा करण्याची कल्पना कोणाच्या मनांत आल्याचें दिसत नव्हतें. १८८० मध्यें **किर्लोस्कर** दक्षिण भाग कमिशनर यांच्या स्वारीबरोबर **पुण्यांत** आले. त्यावेळीं पारशी नाटक पाहून ती तऱ्हा आपल्या लोकांत असावी अशी कल्पना त्यांच्या मनांत उद्भवली व ते त्या प्रयत्नास लागले. या वेळीं **मोरोबा वाघोलीकर** व **बाळकोबा नाटेकर** हे **पुण्यांत** असत. हे दोघेही गाण्यावाजविण्यासंबंधानें लोकांत प्रसिद्ध होते. **मोरोबा** पूर्वीं **मोरशास्त्री वाईकर** म्हणून प्रसिद्ध हरदास असत, त्यांच्याबरोबर कांहीं दिवस, नंतर **मुंबई**चे **रणछोडदास, गोकुळदास देवजी, पनवेलचे विठोबा खंडापा गुळवे,** यांच्या सारख्याच्या आश्रयानें होते. **बाळकोबा** गवयी पेषानें **पुण्यांत**च असत. दोघेही तरुण, देखणे व गायनकलेंत निष्णात असल्यानें, **अण्णा**साहेबांच्या इच्छेनुरूप गोष्टी जुळून येण्याचा योग आला. या वेळेपर्यंत नाटकासंबंधानें लोकांच्या समजुती सर्वत्र अगदीं वाईट असत व त्या चांगल्या असण्याचें कांहीं कारण घडलेंही नव्हतें. अशा स्थितींत नाटकाकडे मंडळींचें मन वळविण्याचें काम अवघड होतें. परंतु एका कलेचा उदय व्हावयाचा होता म्हणून **अण्णासाहेबां**ना त्यांत चांगलें यश आलें. पारशी पद्धतीवर नाटक रचण्याची

संगीत नाट्यकलेंतील आद्य व अद्वितीय नट.



मोरो बापूजी वाघुलीकर, मृत्यु, जाने. १९०८

कल्पना मनांत आल्यापासून त्यांनीं **शाकुंतल** नाटकाचें भाषांतर करण्यास सुरुवात केली होती. त्यांत ही जोडी व तिसरे **अण्णां**च्या पूर्वाश्रमांतले स्नेही **नाना शेवडे** हे मिळाल्यानें **अण्णा** अधिक उत्साहानें कामास लागले. **शेवडे** हे धंद्यानें गवयी नव्हते तरी चांगले गाणारे असत.

याप्रमाणें संगीत नाटकाला अवश्य अशीं निवडक व गुणी पात्रें मिळालीं. यांशिवाय इतर जीं पात्रें पाहिजे होतीं त्यांकरतां **अण्णांनीं** आपल्याच कचेरींतील मोठमोठ्या पगाराची पदवीधर मंडळी ओढली व कोणाला कांहीं, कोणाला कांहीं, अशीं नाटकांतलीं किरकोळ कामें नेमून दिलीं. याप्रमाणें व्यवस्था लागल्याबरोबर तालमीस सुरुवात झाली. सुमारें १८८० च्या आगष्टमध्यें कल्पना निघून **ऑक्टोबर**च्या **१३ वे** तारखेस म्हणजे **विजयादशमी**च्या **सुमुहूर्ता**नें तंबाखू आळींतील **गुळवे** यांच्या हवेलींत पहिल्या तीन अंकांची रंगाची तालीम झाली. तालीम सुरू झाल्यापासून संगीत नाटकाबद्दलचा गवगवा सर्व शहरांत पसरला होताच; परंतु रंगाची तालीम झाल्यापासून लोकांची उत्सुकता अधिक अधिक वाढूं लागली व ते नाटकाचा दिवस कधीं येतो म्हणून वाट पाहत राहिले.

## संगीत शाकुंतल नाटक.

नाटकाचा दिवस ठरला. परंतु नाटकाला नांव काय द्यावें हें ठरलें नव्हतें. कारण अशा प्रकारचें नाटक व याची कल्पनाही पूर्वीं नव्हती. कोणीं "गद्यपद्यात्मक शाकुंतल" म्हणावें म्हणून सुचविलें व कोणी "गायनयुक्त शाकुंतल" हें नांव द्यावें असें सुचविलें. परंतु **अण्णा**साहेबांनीं शेवटीं "**संगीत शाकुंतल**" हेंच नांव योग्य आहे असें ठरविलें व त्याप्रमाणें "**किर्लोस्कर संगीत मंडळी**"च्या नांवाचीं हस्तपत्रकें शहरांत प्रसिद्ध झालीं. मोठ्या जाहिराती लावून प्रसिद्धीची अवश्यकताच राहिली नाहीं; कारण तिकीटें अगोदरच पार खपून गेलीं होतीं. **तारीख ३१ ऑक्टोबर १८८० आश्विन वद्य १३ रविवार शके १८०२ अमृतसिद्धि योग** हा संगीत नाटकाचा प्रथम दिवस. **बुधवार** पेठेंतील त्यावेळीं भरभराटींत असलेलें **आनंदोद्भव नाटकगृह**, तिन्ही मजले गच्च भरलें होतें. "सकल कला गुणवेत्ते पंडित" त्या दिवशीं जमले होते.

प्रत्येकाच्या मुद्रेवर व पात्रांच्या अंतःकरणांत उत्साह दिसत होता. पात्रांची तयारी झाली. सूत्रधार दोन पारिपार्श्वकांसह पडद्यांत सज्ज होऊन नांदी म्हणण्याकरितां उभे राहिले* व आतां नाटयशास्त्रविधीप्रमाणें पडद्यांत

**" पंचतुंडनररुंडमालधर पार्वतीश हा आधीं नमितों "**

हें मंगलाचरण म्हणण्यास सुरुवात करणार, तों जणूं पडदा ओढणारासही तेवढा विलंब असह्य होऊन त्यानें एकदम पडदा वर केला. त्याबरोबर **अण्णा**साहेबांनीं घेतलेली सूत्रधाराची भव्य मूर्ति प्रगट होऊन त्यांचा गंभीर आवाज, **नाटेकर** व **शेवडे** या पारिपार्श्वकांचे गंधर्वतुल्य आलाप प्रेक्षकांच्या कर्णद्वारीं प्रवेश करूं लागले. त्या प्रसंगीं **अण्णांचा** रंगभूमीवरचा हा प्रवेश म्हणजे **संगीत** कलेच्या विश्वकर्म्याचा अवतार असें लोकांस वाटूं लागलें. नंतर नटीचा प्रवेश झाला. तिच्या—

**" खेळ चांगला वेषधर बरे ।**
**असलियावरी काय भय वरें ॥**
**थोर तुमची नाट्यकल्पना**
**विदित ती असे या महाजनां ॥ "**

या पद्यांतील भावार्थ वस्तुस्थितींत अगदीं बरोबर होता. नाटकांत उत्तमोत्तम असें 'शाकुंतल' नाटक, संगीताची अपूर्व कल्पना व संगीताकरितांच ब्रह्मदेवानें निर्माण केलेलीं सर्वोत्तम नाटकपात्रें या सर्व गोष्टी संगीत नाट्यावतरणाच्या प्रथम दिवशींच लोकांच्या खऱ्याखऱ्या प्रत्ययास आल्या. नाटकाची प्रस्तावना झाल्यावर प्रथम हरिणामागें लागलेला दुष्यंत राजा सारथ्यासह पुढें आला. सारथ्याची भूमिका **केशवराव शुक्ल**— यांस फौजदारही म्हणत असत— नांवाच्या गृहस्थाकडे असे. यांचा बांधा ठेंगणा असून शरीराची ठेवण चांगली व आवाजही साधारण बरा असे. त्यांनीं,

**" दौरत है मृग चली आपकी मूरत धनुक चढाके "**

ही साकी म्हणतांच प्रेक्षकांचें अवधान पुढील पात्रांकडे ओढलें. तों लागलींच दुष्यंताच्या:

---

* नांदी ( मंगलाचरण ) पडद्यांत म्हणून सूत्रधारानें प्रवेश करावयाचा असा कांहीं संस्कृत नाटकांतील सांप्रदाय आहे. परंतु वरील प्रसंगीं ती प्रथमच रंगभूमीवर म्हणण्यांत आली.

**" काय बेटच्या हरिणाची मजा तरी वायुगति पळतो "**

या पदास सुरुवात झाली. दुष्यंताची भूमिका **मोरोबा वाघोलीकर** यांचे-कडे होती. त्यांच्या एकंदर शरीराचा बांधा राजकीय वेषाला साजेल असा, व रंगभूमीवर येण्याचा आवेश प्रसंगाला अनुरूप होता. यांच्या सुस्वरकंठांतील पहिलें पद ऐकतांच प्रेक्षकांचें अंतःकरण, श्रोतृ आणि नेत्र अधिकाधिक आतुर होऊं लागले. या प्रवेशांतच शिकारीपासून परावृत्त करण्याला वैखानसाच्या वेषानें **अण्णा**साहेब प्रविष्ट झाले. त्यांचा धिप्पाड देह व

**" शशिकुलभूषण गुणवंता ऐकें मद्वच दुष्यंता "**

हें त्यांच्या तोंडून द्रव उत्पन्न करणारें पद ऐकून व त्यांचा त्यावेळचा आविर्भाव पाहून प्रेक्षक थक्क होऊन गेले.

शकुंतलेची भूमिका या चरित्रलेखकानें ( मि. शं. बा. मुजुमदार ) घेतल्यानें त्यांनीं आपलें नांव या ठिकाणीं क्रमप्राप्त असतां गाळलें ! परंतु मि. मुजुमदारांचा स्त्रीवेष—गर्भश्रीमंताचे घराण्यांतील यौवनयुक्त रूपसंपन्न—तरुणींसही खालीं मान घालावयास लावील असा " रूपसुंदरी " परिपूर्ण होता. तसेंच भाषण गोड, सभ्य अभिनय, ठसठशीत कुंकुमतिलक, गोंडस अंगलोट, वर्ण सुवर्ण केतकीसारखा, सर्व प्रकारें मोहक असा होता !

नंतर शकुंतला दोघी सख्यांसह झाडांना पाणी घालीत येत आहे असा प्रवेश आला. तो प्रसंग किती मनोहर होता याचें दुष्यंताच्या:

**" किति मधुर रूप तरि यांचें । मम नेत्र धन्य अजि साचे ।**
**नृपमंदिरीं यापरि कैचें । वन हरी सत्व बागेचें । किति वर्णुं**
**येईना वाचें । या बघतां कामि न वांचे । हळु हळु चमकति**
**बागेंतुनिया । विद्युल्लता तशा या ऋषिजा । भाग्योदय माझा ॥१॥"**

या पद्यांतच वर्णन आहे. स्वतः **मोरोबाच** आपला अनुभव अद्याप सांगतात कीं, " रंगभूमीवर आरंभीं माझी किंचित् संकोचवृत्ति होती, परंतु शकुंतलेचा प्रवेश झाल्याबरोबर मी तद्रूप बनलों." पुढें पहिल्या अंकांतील प्रत्येक प्रसंगांत त्यांनीं अभिनय आणि संगीत यांनीं प्रेक्षकांची चित्तवृत्ति तल्लीन करून सोडली.

पहिला अंक संपला. त्याबरोबर कोणी **अण्णा**साहेबांची व कोणी **मोरोबांची** तारीफ करण्याकरितां पडद्यांत आले. **केरुनाना छत्रे, विठोबा आप्पा गुळवे, नानासाहेब साठे** दप्तरदार या मंडळींचा **मोरोबांवर**

अतिशय लोभ असे. **मोरोबांच्या** हातून पहिल्याच खेपेला इतकें उत्तम काम होईल कीं नाहीं ही त्यांना शंका होती. **विठोबा आण्णा** तर म्हणत कीं, " **मोरोबा** जड बुद्धीचे यांच्या हातून कसलें येवढें अवघड काम होतें ! " परंतु **मोरोबांनीं** सगळ्याच कल्पना खोटया केल्या व पहिल्या प्रसंगाला इतकी कांहीं करामत केली कीं, चांगल्या अनुभाविक नटांकडूनही प्रसंगीं तशी होत नाहीं.

दुसऱ्या अंकास सुरवात झाली विदूषक **गंगाधर भीमराव जांभेकर*** बी. ए. हे होते. आणखी दोन **१ पु. वि. गोडबोले २ नानासाहेब सोमण** ( छत्रधर ) पदवीधर, करभक, रैवतक वगैरे साधारण कामास होते. पहिल्याप्रमाणेंच दुसरा अंकही बहारीचा उडाला. तिसऱ्या अंकास सुरवात झाली. या अंकांतही अर्थबोध होणाऱ्या व सरळ पद्यांनीं **मोरोबांनीं** इतकें नाट्यकौशल्य दाखविलें कीं, त्या प्रसंगाची कल्पना प्रेक्षकांच्या मनांत तंतोतंत उतरून दिली.

चौथा अंक सुरू झाला. हा अंक शाकुंतल नाटकांत सर्वांत सरस आहे असें रसज्ञ म्हणतात. कण्वाची भूमिका **बाळकोबा नाटेकर** यांचेकडे होती. प्रथमच प्रसंग व डोळे दिपविणारा प्रेक्षकसमूह पाहून **नाटेकर** आरंभीं किंचित् कचरल्यासारखे दिसले. परंतु अखेरीस त्यांनींही लोकांना इतकें तल्लीन केलें कीं त्यांचें

**" परक्याचें धन कन्या तें त्या देउनि आज मि सुटलों ।**
**ठेव जशी मालकाशीं अर्पुनि आज ऋणांतुनि फिटलों ॥**
**मुलीनों या आतां ॥ गेली लाडकि मम दुहिता ॥ "**

हें शेवटचें पद्य संपून पडदा पडतांच प्रेक्षक स्वप्नसृष्टींतून जागे झाल्या प्रमाणें देहभानावर आले.

याप्रमाणें **पुणें** शहरांत— नव्हे महाराष्ट्रांत संगीत नाट्यकलेचा अवतार होतांच, लोकांना करमणुकीचें एक नवें युग मिळाल्यासारखें झालें. नवे नेत्र मिळाल्यासारखे झाले व नवे श्रोत्र आल्यासारखे झाले.

पहिला प्रयोग होतांच **अण्णा**साहेबांचें, संगीत नाटकाचें व त्यांतील

---

* हे गृहस्थ सप्टेंबर महिन्यांत परलोकवासी झाले. हे विजापुरास मामलेदार होते

संगीतांतील गायन–वादन–पटु नट



**बाळकोबा नाटेकर.**

मृत्यु जानेवारी १९१०

गायक पात्रांचें नांव सर्वतोमुखीं झालें व पुन्हां प्रयोग पहाण्याविषयीं लोकांची उत्कंठा अनावर झाली. ”

या चरित्राचे भागामध्यें मुख्य नायिका शकुंतला ही भूमिका कोणाचे वांट्यास आली तें रा. रा. मुजुमदारांनीं गुप्त ठेविलें होतें तें मी उघड केलें आहे. त्याचें कारण या शकुंतलेची भूमिका खुद्द मुजुमदारांनीं गौरवयुक्त शोभविली होती. रा. शंकरराव मुजुमदार त्यावेळीं न्यू इंग्लिश स्कूलमध्यें ६ वे इयत्तेंतील विद्यार्थी होते, व त्यापूर्वी ते सांगलीकर पौराणिक नाटक मंडळीमध्यें स्त्रीवेष घेत असल्यावेळेपासून सुप्रसिद्ध होते. वरील वर्णनामध्यें दुष्यंताची भूमिका मोरोबा वाघोलीकर यांचेकडे होती हें आलेंच आहे. यांचा एकंदर शरीराचा बांधा राजकीय वेशाला साजेल असाच होता असें लिहिलें आहे. त्याच तोडीची रा. शंकरराव मुजुमदार यांचे शरीराची अंगलट, सुवर्ण केतकीसारखा वर्ण, बोलण्याचालण्याची ढब कुलवधूची, हरिणाच्या नेत्रासारखे नेत्र इत्यादि हें गर्भश्रीमंताचे घराण्यांतील गृहलक्ष्मीलाही लाजविणारें स्त्रीसौंदर्य असल्यानें त्यांची योजना शकुंतलेच्या भूमिकेस अगदीं यथार्थ झाली होती. या सर्व पात्रांचे योजक किर्लोस्कर यांचें नाट्यनैपुण्यच तारीफ करण्यासारखें आहे. रा. मुजुमदार यांस गायनकला साध्य नव्हती तरी त्यांनीं त्या वेळच्या संगीत प्रयोगामध्यें किंचितही उणीव जाणूं दिली नाहीं. पुढें रा. लक्ष्मण बापूजी ऊर्फ भाऊराव कोल्हटकर हे रूपानें सुंदर, पल्लेदार व मधुर आवाजाचे संगीतकुशल नट लाभल्यानें त्यांची शकुंतलेच्या पात्राचे जागीं योजना होऊन त्यांचेसाठीं पद्येंही तयार झालीं. हीं पद्यें खुद्द अण्णासाहेब यांनीं रचलीं नसून त्यांचे आज्ञेवरून त्यांचे शिष्य रा. रा. गोविंदराव देवल यांनीं रचिलीं. हीं पद्यें शुद्ध, सुबोध, प्रासादिक व रसिकांस मान्य अशीं झालीं आहेत. कै. देवल यांनीं संगीत नाटकाचे कवित्वास येथूनच आरंभ केला होता. ह्यानंतर त्यांनीं संगीत विक्रमोर्वशीय, मृच्छकटिक, शापसंभ्रम, शारदा, संशयकल्लोळ या नाटकांमध्यें जी प्रसिद्धि मिळविली तो मान अजून कोणासही प्राप्त झाला नाहीं. असो.

कै. किर्लोस्कर जसे प्रासादिक कवि होते, तसे ते उत्तम नटही होते. शाकुंतलमध्यें कण्व शिष्य शार्ङ्गरवाची भूमिका त्या काळीं त्यांनीं अशी

वठविली कीं त्याचा शतांशही आतांपर्यंत कोणासही साधला नाहीं. संगीत शाकुंतलामधील ५ वे अंकांतील एका प्रवेशाचा फोटो दिला आहे, त्यामध्यें धिप्पाड व ६॥ फूट उंच शरीराचे, गंभीर चेहेऱ्याचे शार्ङ्गरव, हातांत उंच वेत्रदंड घेऊन उभे आहेत, तेच अण्णासाहेब किर्लोस्कर. या प्रवेशामध्यें शार्ङ्गरवाच्या एका पद्यामध्यें "निज धन तें चोराला" हें पद्य आणि यांत एका गद्याचे शेवटीं "अधःपात!" असा शब्द आहे. या दोन ठिकाणीं रसिक प्रेक्षकगणांनीं टाळीची कडकडून गर्जना केली नाहीं असा एकही प्रयोग त्या काळीं झाला नाहीं. तो प्रसंग ज्यांनीं पाहिला आहे त्यांस त्या प्रसंगाची जीवमानपर्यंत कधींही विस्मृति होणार नाहीं. कै. किर्लोस्कर हे संगीत शाकुंतलामध्यें सूत्रधार, वैखानस, सेनापति, शार्ङ्गरव कंचुकी, मारीचऋषि या भूमिका रंगभूमीशीं तादात्म्य होऊन करीत असत. ती तादात्म्यता आतांपर्यंत कोणासच साधली नाहीं! कै. बाळकृष्ण नारायण नाटेकर हे संगीत शाकुंतलामध्यें दुष्यंत राजाचा सारथी, वैखानसांचा शिष्य, कण्व, सेनापति, इंद्रसारथी मातली, इत्यादि भूमिका शोभवीत असत. यांमध्यें कण्वऋषींची भूमिका ते उत्कृष्टच आपल्या मधुर कंठानें मोठ्या बहारीची करून प्रेक्षकांपैकीं ज्यास कन्यादानाचा लाभ झाला असेल त्यास पराकाष्ठेचा गहिंवर आणून कन्यादानाची प्रत्यक्ष आठवण करून देऊन (४ थ्या अंकांतील शेवटची साकी) "गेली लाडकी मम दुहिता" या चरणाचे गहिंवरयुक्त गायननैपुण्यानें कमाल करून सोडीत. कै. नाटेकर यांचे पश्चात् आतांपर्यंत कण्वाची भूमिका रिकामी पडून आहे. कै. किर्लोस्कर व नाटेकर श्रेष्ठ व कनिष्ठ भूमिका घेण्यांत उच्च—नीचभाव न मानतां त्या त्या भूमिकेशीं शिकस्तीचें तादात्म्य दाखवीत. प्रस्तुतचे सर्व नटसम्राट' म्हणविणारांनीं हें मनन करण्यासारखें आहे.

सं. शाकुंतलाचे ४ थे अंकांत कण्वऋषींचीं १८८० सालीं जीं पद्यें घातलीं आहेत तीं विशेषतः कै. नाटेकरांचे कंठमाधुर्यतेकडे पूर्ण लक्ष देऊनच किर्लोस्करांनीं रचिलीं होतीं; परंतु सन १८८४ मध्यें पनवेल येथें अण्णा किर्लोस्कर हे आपल्या सं. मंडळीसह कै. विठोबा खंडापा ऊर्फ आप्पासाहेब गुळवे यांचे आश्रयानें नवीन रामराज्यवियोग

नाटकाची रचना करण्यापुरते राहिले त्यावेळीं किर्लोस्कर यांचा व नाटे-कर यांचा बेबनाव होता; त्यामुळें पनवेल व कल्याण या शहरीं जे संगीत शाकुंतलाचे प्रयोग झाले त्यांमध्यें कण्वाची भूमिका स्वतः किर्लोस्क-रांनीं घेऊन नाटेकरांचे कंठास अनुरूप जीं पद्यें १८८०सालीं रचिलीं होतीं त्यांचे बदली १८८४ सालीं स्वतःचे कंठास अनुरूप अशीं नवीन पद्यें रचून कण्वाची भूमिका किर्लोस्करांनीं अशी बहारीची करून दाख-विली कीं " खरे खरे कण्व ऋषि ते हेच "असा प्रेक्षकांस भास झाला. ही भूमिका नाटेकरांनीं जर पाहिली असती तर बेबनावाची गोष्ट बाजूस ठेवून त्यांनींही अण्णासाहेबांस 'धन्य धन्य' म्हटलें असतें. हीं एकाच प्रसंगाचीं कण्वाचीं दोन दोन पद्यें प्रस्तुतचे आवृत्तीमध्यें एका-सालीं एक छापलीं आहेत. तीं तुलनात्मक दृष्टीनें वाचिल्यास कै० किर्लोस्करांचे या दोन प्रकारचे कवितांमध्यें अर्थपूर्ण प्रासाद कसा खचून भरला आहे हें निदर्शनास येईल. त्या समयीं नाशिकचे संस्कृत भाषाकोविद रा. रा. बाबासाहेब कुळकर्णी यांनीं अण्णांच्या या दोन प्रकारच्या भाषांतराची फारच तारीफ करून असें स्पष्ट मत दिलें कीं, कवि मोरोपंताचे रामायणाप्रमाणें आपण शाकुंतलाचीं १०८ प्रकारचीं संगीत शाकुंतलें निर्माण कराल यांत शंकाच नाहीं.

सन १८८० सालीं 'संगीत शाकुंतल' नाटकाची रचना झाली त्यावेळीं अण्णासाहेब हे दक्षिण भाग कमिशनर मि. ए. टी. क्राफर्ड यांचे ऑफिसांत कारकून होते व त्याच वेळीं नानासाहेब साठे, नारायण चिंतामण सोमण हे इंग्रजी व मराठी दफ्तरावरील मुख्य अधिकारी असून गंगाधर भिमराव जांभेकर बी. ए., हे हेड क्लार्क, पुरुषोत्तम विष्णु ऊर्फ बळवंतराव गोडबोले बी. ए., हे इंग्रजी क्लार्क असून ते पुढें मुंबई सेक्रेटरीएटमध्यें रेव्हिन्यू खात्याचे चीफ सुपरिंटेंडंट झाले. गंगाधर भीमराव जांभेकर बी. ए., हे विदूषकाची भूमिका करीत असत. मुंबईस एका प्रसंगीं कै. श्री. शिवाजीराव होळकर यांनीं किर्लोस्कर मंडळीचा 'संगीत शाकुंतलाचा' स्वतंत्र खाजगी प्रयोग—मुंबईतील विद्वान् व रसिक मंडळींस मुद्दाम निमंत्रणें पाठवून त्यांच्यासह पाहिला; त्यावेळीं रा० जांभेकरांस कांहीं अडचणीनें येतां आलें नाहीं तेव्हां विदूषकाची भूमिका सोलापूरचे रा. रा. सखारामपंत ऊर्फ बापूसाहेब किर्लोस्कर

बी. ए., हायकोर्ट वकील यानीं केली होती. अशी विद्वान्, तेजस्वी व रसिक मंडळी दक्षिण भाग कमिशनरचे ऑफिसांत एकत्रित झाल्यानें या ऑफिसास लोकदृष्टीनें हें संगीत नाटक मंडळीचेंच ऑफिस असें नांव सर्वतोमुखीं झालें. या मंडळीबरोबर नानासाहेब शेवडे मधुर आवाजाचे ( पुढें पंढरपूरकोर्टांचे नाझर ) होते. आरंभीं 'सं. शाकुंतला'चे प्रयोग मुंबईस होऊं लागले त्यावेळीं नाटकगृहाचे दरवाज्यावर तिकिटें पाहून सोडण्याचे कामीं मुंबई हायकोर्टांतील वकील मंडळी "डोअरकीपर" म्हणून मोठ्या प्रेमानें येऊन उभी राहून काम करीत असत; त्यांमध्यें मुख्य पुढारी महादेव चिमणाजी आपटे हे असून त्यांचे मदतीस रा.रा. गणेश रामचंद्र किर्लोस्कर ( कै. अण्णांचे मावस बंधू ),विनायक महादेव पंडित (पुढें बडोद्याचे ना.दिवाण झाले.), महादेव भास्कर (आतां सर महादेव) चौबळ, गंगाराम बापसोबा रेळे, इ. प्रमुख मंडळी हजर असत आणि नाटकाच्या हँडबिलावर आपटे, किर्लोस्कर व चौबळ या हायकोर्ट वकिलांच्या मॅनेजर म्हणून सह्या असत. आपटे व गणपतराव किर्लोस्करांचे मृत्यूनंतर चौबळ व डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे, बी. ए., एम्. डी., यांच्या सह्या येऊं लागल्या. पुण्याचे हँडबिलावर डॉ. गणेश कृष्ण गर्दे, एल्. एम्. अँड एस्. यांची सही येत असे.

याच धोरणानें पुढें किर्लोस्कर मंडळी बेळगांव, धारवाड, हुबळी, सोलापूर,बार्शी,नाशिक इत्यादि ठिकाणीं जाऊं लागली, त्या प्रसंगीं त्या त्या गांवचे पुढारी व वकील यांच्या सह्या हँडबिलावर येऊं लागल्या. कै. नामदार काशिनाथ त्रिंबक तेलंग, बाळ मंगेश वागळे, कै. महादेव मोरेश्वर कुंटे, कै. गोपाळराव आगरकर, एम. ए. यांचीं भाषणें नाटकाचे प्रयोगाचे प्रसंगीं नाटकगृहामध्यें रंगभूमीवर विद्वानांस चित्ताकर्षक व किर्लोस्करांच्या अभिनंदनार्चीं होऊं लागलीं आणि 'संगीत शाकुंतला'चे साग्र प्रयोगास रसिक प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या.

पुणें व बेळगांव यांचे दरम्यान रेलवे चालूं नव्हती अशा वेळीं आगाऊ तारेनें तिकिटें घेऊन व जागा रिझर्व करून शेंकडों मैलांचे प्रवास फैटणी— टांग्यानें करून रसिक प्रेक्षक येऊं लागले.

केसरीच्या मुख्य चालकांवर कोल्हापूरची "बर्वे केस" सुरूं झाली; त्याच संकटकाळीं विष्णुशास्त्री चिपळूणकर हे कैलासवासी झाले.

हा कठीण प्रसंग जाणून कै० शास्त्रीबोवांचे स्मारकास मदत म्हणून 'सं. शाकुंतल'चा अंक एक ते पांचचा प्रयोग करून सर्व उत्पन्न त्या स्मारकास देऊन शिवाय संगीत शाकुंतल व संगीत सौभद्र या नाटकांचे (पुस्तकाचे) हक्क **आर्यभूषण** छापखान्यास देणगी म्हणून अल्प रकमेस दिले. त्याचा फायदा **आर्यभूषण** छापखान्यास एकसारखा मिळत आहे हें अभिनंदनीय आहे.

कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं सन १८८१ सालीं केसरीमध्यें "नाटकें करावीं कीं करूं नयेत" म्हणून निबंध लिहिला होता; त्याचा उल्लेख कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें चरित्र पृ. ९५ आधारें खालीं दिला आहे.

**केसरी** पत्रांतही त्यावेळीं " नाटकें करावीं कीं करूं नये ? " म्हणून एक प्रमुख निबंध आला होता. त्यांत **विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांनीं संगीत नाटकासंबंधानें अगदीं निःपक्षपातानें विवेचन करून **किर्लोस्करांनीं** महाकवीच्या कृतीचा उद्धार केल्याबद्दल त्याची किती योग्य स्तुति केली आहे ती वाचण्यासारखी आहे: ते **म्हणतात,**

"ही नवीन टूम रा. किर्लोस्कर यांनीं गेल्या (१८८०) सालीं काढली. हे गृहस्थ रेविन्यू कमिशनरच्या आफिसांत नौकर आहेत; यास्तव तें आफिस बरसातीकरितां पुण्यांत आलें असतां त्या चातुर्मास्यांत रंगदेवतेची उपासना करून पुण्यजनमनोरंजन वर्षातून एकदां करावें हा त्यांनीं संकल्प केलेला आहे. यांस नाटयाचा व काव्यरचनेचा पहिल्यापासून नाद आहे म्हणून ऐकतों. " शाङ्करदिग्विजय " या नांवाचें एक नाटकही यांनीं महाराष्ट्र भाषेंत निर्माण केलें आहे. तेव्हां या सर्व गोष्टींवरून ' संगीताचे ' कर्ते रसिकांत मोडण्यासारखे आहेत हें उघड दिसतें. यास्तव स्वतःची हौस फेडून लोकांसही चार घटका उत्तम रीतीची करमणूक करण्याचा संकल्प नाटयाचार्यानें केला हें सहजच आहे. आतां जो सरकारी नोकर आहे त्यानें नित्याची श्ववृत्ति आटपल्यावर घरीं जाऊन हात जोडून स्वस्थ बसावें, कांहीं इतर कामधंदा त्यास करतां कामा नये, हें अलीकडे जें बादशाही सूत्र

निघालें आहे त्यास नाट्यकर्म हें कितपतसें विरुद्ध येईल हा विचार निराळा; पण एरव्हीं सामान्य समजुतीस अनुसरून पाहतां आम्हांस तर असें वाटतें कीं, राजकार्यांच्या व्यतिरिक्त वेळांत वरिष्ठांच्या घरांचे उंबरठे पुजणें किंवा रिकाम्या चकाटया पिटीत बसणें यापेक्षां रा. किर्लोस्करांनीं केलेला कालक्षेप फार उत्तम होय. ख्रिस्ती धर्मांत जशी आदितवारीं कोणतेंही काम करण्याची सक्त मनाई आहे त्याप्रमाणेंच राजसेवानिरतांस नेहमींचा प्रतिबंध आहे खरा व यासंबंधानें कांहीं परोपकारी मंडळींनीं कमिशनर साहेबांपर्यंत वरील भरतपुत्राचा बोभाटा नेल्याचें ऐकिवांत आहे; तरी एकंदर लोकांच्या तर्फे नवीन टूम काढल्याबद्दल रा. किर्लोस्करांचे आभार मानल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. इंग्लंडांत ‘ ऑपेरा ’ या नांवाचा एक नाट्यप्रकार आहे, त्याचाच नमुना हा वरील गृहस्थानें इकडे सुरू केला असें म्हणावयास हरकत नाहीं. त्याचा मासला आजपर्यंत एका पारशी खेळांत मात्र दृष्टीस पडत असे. पण त्याहून हल्लीं सुरू झालेलें संगीत किती उत्तम आहे हें दोन्ही चिजा ज्यानें पाहिल्या असतील त्यास सांगावयास नकोच. एक तर पारशी मंडळींचा एकच एक सूर कंटाळवाणा, तसें इकडे नाहीं; शिवाय त्यांच्या संविधानकांत व नाटयांत व इकडल्या दोहोंत तर अतिशयच फरक! तेव्हां संगीत शाकुंतलाची जी पहिली तारीफ करावयाची ती एवढ्याकरितां कीं हा निराळा प्रघात आमच्यांत सुरू झाला. गायन हें मनुष्यमात्रास किंबहुना पशुकोटींतील कित्येकांसही स्वभावतःच अत्यंत प्रिय आहे; यास्तव त्याच्या द्वारें मनोरंजनाची प्रवृत्ति पडणें हें किती इष्ट होय हें सांगावयाला नकोच. दुराचार व ग्राम्यता यांच्या मूर्ति ज्या वेश्या त्यांच्याखेरीज वरील चित्तरंजनाचा प्रकार जर उपलब्ध होऊं लागला तर ही थोडी सुधारणा नव्हे. यास्तव येथें आज कित्येक वर्षें एक गायनसमाज निघाला असून त्याच्या द्वारें ज्या प्रकारची नवी गोष्ट अंमलांत येणार आहे त्यासारखेंच संगीताचेंही पर्यवसान असल्यामुळें त्याचें आम्हीं अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों......

रा. किर्लोस्कर यांच्या संगीतांतला दुसरा गुण म्हटला म्हणजे त्यांतील

मायनप्रकार. रा. किर्लोस्कर यांनीं दोन गवय्ये मुख्य पात्रांत घेतल्यामुळें त्यांच्या प्रयोगांस फार यश आलें. पूर्वीं कोणत्याही नाटकांवर लोकांच्या इतक्या उड्या पडल्या नाहींत; व नवीन चाली लोकांस अत्यंत प्रियकर होऊन सदरील नाटकाची एक हजाराची प्रत सुद्धां उडून गेली. तर पात्रांच्या यथायोग्य निवडणुकीमुळें प्रस्तुत प्रयोग हा लोकांस फार मनोहर होऊन गेला.

तिसरा गुण नाटकाचा यथास्थित अभिनय हा होय. हा अभिनय सव पात्रांचा यथोचित होणें हें मोठें कठिण असतें. तरी प्रकृत प्रयोगांत केवळ दोष ठेवण्यासारखें एकही पात्र नसून कांहीं तर चांगलींच होतीं. दुष्यंत शकुंतला, भरत, कण्व, शार्ङ्गरव या पात्रांचीं कामें खरोखर वर्णनीय होत तीं पाहूनही जो तटस्थ राहिला असेल व ज्यास कांहींच आनंद झाल नसेल, त्या प्रेक्षकाची धन्य म्हटल्यावांचून राहवत नाहीं. ' स वै मुक्तोऽथव पशुः ' हा चरण वरील बहाद्दरांस लागू करण्यास आम्हांस बिलकूल हरकत दिसत नाहीं ! आतां हें खरें आहे कीं, रा. किर्लोस्कर यांनीं केलेलें भाषांत छापील पुस्तकावरूनच जर वाचलें तर कितपत गोड लागेल हें आमच्या सांगवत नाहीं व कांहीं ठिकाणीं तर शब्दसौष्ठवांत जी त्यांची उणीव आ ती ऐकल्याबरोबरही उमगण्यासारखी आहे. तरी त्यांच्या तर्फेनें एवढें खा म्हणतां येईल कीं मूळ महाकवीच्या कृतीवरून होणारा जो आल्हाद त सदरील प्रयोगावरूनही बऱ्याच प्रकारें होतो, व साऱ्या जगास मोहून टाक णारी जी कविकुलगुरूची करामत तिचें चीजही वरील प्रयोगकारां बरेंच केलें ! "



अण्णांनीं सन १८८१ या वर्षी शाकुंतल नाटक पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले 'शाकुंतल' नाटकाचें खरें मर्म त्यांस त्यांच्या तीर्थरूपांपासून कळलें होतें म्हणू त्यांनीं तें पुस्तक पितृभक्तिपुरःसर आपल्या वडिलांसच अर्पण केलें. हें पुस्त प्रसिद्ध झाल्यानें मराठी ग्रंथसंग्रहांत एका उत्तम ग्रंथाची भर पडली व सुशिक्षि स्त्रीवर्गाला गाण्यावाचण्याच्या कामांत सहाय्य करण्याला एक साधन मिळाले

आरंभीं किर्लोस्करांचे साह्यकारी असलेल्या हॉयकोर्ट वकिलांचेपैकीं बहुतेक दुर्दैवानें कालवश झाले त्यांपैकीं सुदैवानें आज हयात असे सर माहदेव चौबळ हे एकच सन्मान्य गृहस्थ आहेत. सर महादेव यांचेवर अण्णांचें त्यावेळीं कनिष्ठ बंधूप्रमाणें प्रेम असे. प्रेमभरामध्यें किर्लोस्कर हे सर साहेबांस **महादेव** म्हणून एकेरी नांवानें प्रेमळ हाक मारीत व सर साहेबही प्रेमाची 'ओ' देत ! कै० अण्णासाहेब किर्लोस्करांचे मृत्यूनंतर रा.रा. चौबळ हे मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश, नंतर मुंबई सरकारचे एक्झि० कौन्सिलर होऊन त्यांस सरकारनें ' सर ' ही मानाची पदवी देऊन सन्मान केला. हा सुयोग पाहणेस सुदैवानें जर कै० गणपतराव किर्लोस्कर व कै० अण्णासाहेब किर्लोस्कर हयात असते तर सख्या बंधूप्रमाणें त्या उभयतांस पराकाष्टेचा आनंद झाला असता.

त्यावेळीं किर्लोस्कर हे कमिशनरचे ऑफिसांत कारकून असतांना बडोद्याहून या विद्वानांच्या संगीत मंडळीस श्री. महाराज सयाजीराव गायकवाड यांनीं बडोद्यास बोलाविल्यावेळीं या संगीत नाटक मंडळींचे ऑनररी सेक्रेटरी म्हणून कै० रावसाहेब चौबळ ( सर महादेव चौबळांचे वडील बंधू ) हे मंडळीबरोबर गेले व त्यांनीं सं. शाकुंतलाचे प्रयोगाचे आरंभीं रंगभूमीवर येऊन संस्थानचे आमंत्रणाचा स्वीकार कसा केला तें आपल्या मधुर व गोड इंग्रजी भाषेनें गौरवयुक्त बोलून आपले इंग्रजी भाषानैपुण्याची छाप महाराज श्री. सयाजीराव गायकवाड प्रभृति प्रेक्षकांवर पाडली. ह्याचा परिणाम त्यावेळीं बडोदें शहरांत या मंडळीमध्यें सर्वच युनिव्हर्सिटीचे पदवीधर आहेत असा होऊन सर्वतोमुखीं तारीफ होऊन राहिली.

दिवाणसाहेबांनीं किर्लोस्कर मंडळींचा उत्तम गौरव, उत्तम पाहुणचार करून त्यांस उत्तम बिदागीही दिली. असे गौरवाचे प्रसंग लिहीत गेल्यास विस्तार फारच होईल.

सौभद्र नाटक रा. ब. केरूनाना छत्रे– डेक्कन कॉलेजमधील गणित-शास्त्राचे प्रोफेसर–यांस नजर केलें आहे. “गणिती विद्वानास संगीत नाटक पुस्तक नजर करणें” हें जरा चमत्कारिक वाटेल. कारण गणित-शास्त्री हे बहुतेक संगीत कलेविषयीं अरसिक असावयाचे असा निदान त्या कालचाच नव्हे तर आतांपर्यंचाही बहुतेक तोच अनुभव आहे. परंतु या समजुतीस फक्त केरूनाना हेच अपवाद होत. नानांच्या सहवासांतील मंडळी बहुतेक संपली आहेत! परंतु माझे स्नेही कै. विठोबा खंडापा गुळवे यांच्या सहवासांत त्यांचे परम मित्र केरूनाना यांचाहि मला अल्प सहवास जो घडला त्यांत नानांस गायनाचा उत्तमच नाद होता येवढेंच नव्हे तर ते गायनांतील उत्तम ताना ( ललकाऱ्या ) घेऊन दाखवितानां मीं स्वतः ऐकलें आहे व त्यांचे तोंडूनच मी असेंहि ऐकलें आहे कीं, माझ्या गुरूनें तूं गायन गाऊं नको व फल ज्यो-तिष्याचे विद्येंतही पडूं नको असें मला सांगितलें आहे.” असे उद्गार निघत; परंतु या दोहींचा प्रतिबंध करण्याचें कारण मात्र त्यांचेकडून समजलें नाहीं. गायनासंबंधीं कै० केरूनाना यांनीं एक छोटें पुस्तक लिहिलें होतें व त्यांत त्यांनीं गणिताच्या प्रमाणानें स्वर कसे बनतात तें दर्शविलें होतें. ‘संगीत शाकुंतल’ नाटकाच्या तालमी होत असत त्या वेळीं कै. केरूनाना व कै. आप्पासाहेब गुळवे हे जोडीनें त्या ऐकणेस क्वचित् वेळीं जात असत. ह्या प्रसंगीं कै. मोरोबा वाघोलीकर व बाळकोबा नाटेकर हे संगीतकुशल नट, आपल्या पदांमध्यें ललकाऱ्या, ताना जोराजोरानें मारीत, त्या वेळीं अर्थहानि व रसाचा बेरंग कसा होतो हें नाना अनेक वेळां कै. गुळवे यांस समजावून सांगत असत. परंतु तालमीचा बेरंग होईल म्हणून तेथें नाना बोलत नसत. तथापि त्यांची व मोरोबा आणि नाटेकरांची भेट होई तेव्हां ते पदें म्हणून घेऊन तानांमुळें नाटकरसाची हानि कशी

होते हें त्यांस समजावून देत व तें त्या दोघांस पटतही असे. या उपदेशाप्रमाणें या दोघांनीं रंगभूमीवर **फाजील ताना** मारण्याचें सोडून दिलें. परंतु " गायनाचाही बदरंग होऊं देऊं नका. " असेंही नानांनीं स्पष्ट बजावून समजावून दिलें होतें. या नानांच्या रसिकतेवर व अलौकिक गुणांवर लुब्ध होऊन कै. अण्णा किर्लोस्कर यांनीं ' संगीत सौभद्र ' नाटक त्यांस अर्पण केलें आहे.

ता. ९-८-२९ चे दैनिक ' ज्ञानप्रकाश ' पत्रांत " काव्यशास्त्र विनोद " या मथळयाचे खालीं प्रो. चिंतामणराव भानू यांनीं " **आधुनिक मराठी नाटकाचा इतिहास** " म्हणून जो लेख लिहिला आहे त्यांत " श्रीपाद भट व धोंडोपंत ( मराठे ) सांगलीकर नाटक मंडळींनीं आपलें नाट्यकौशल्य पुणेकरांस दाखविलें, त्यावेळीं कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर, कै. केरोपंत नाना छत्रे, ( माझे माहितीप्रमाणें वरील विद्वानांबरोबर पनवेलचे श्री. विठोबा खंडापा ऊर्फ आपासाहेब गुळवे हेही होते. ) यांसारखी बडी बडी मंडळी या नाटकास हजर रहात. इतकेंच नव्हे तर तालीम घेण्यासही जात असत. कै. अण्णासाहेब किर्लोस्करांनीं पुष्कळ सुधारणा केली; पद्यें पात्रांनीं म्हणावयाचें ठरविलें. ( या किर्लोस्कर सं. मंडळींत मूलारंभीं प्रसिद्ध गायन व अभिनयकुशल नट, मुख्यत्वें कै. मोरोबा वाघोलीकर, कै. भाऊराव कोल्हटकर व बाळकृष्ण ऊर्फ बाळकोबा नाटेकर हे रंगभूमीवर होते ). सूत्रधार प्रास्ताविक भाग आटोपल्यानंतर पडद्यांत गेला. पुस्तकाप्रमाणेंच पात्रांनीं भाषणें करावीं असें ठरविलें. सीनसिनरी वाढविली, अभिनयाला शिस्त लाविली, हें सर्व कबूल आहे; पण अण्णासाहेबांनंतर किर्लोस्करादि मंडळया धंदेवाईक झाल्या तेव्हां **अभिनयाचें शिष्टस्वरूप जाऊं लागलें, गाण्याच्या तानांमध्यें तसल्या अभिनयालाही अवसर राहिला नाहीं.** कालाचें भान हरपलें " वगैरे जें लिहिलें आहे तें अक्षरशः खरें आहे व तसें सं. सौभद्र नाटक प्रस्तुत वठतही नाहीं.

कै. केरोपंत नाना छत्रे हे रसिक व अलौकिक गुणमंडित होते वगैरे जें वर लिहिलें आहे त्यासंबंधीं विशेष खुलासा व पुरावा प्रो. भानूंचे लेखामध्येंही आहे. नाना यांस गायनकला सशास्त्र व गणिताधारें सप्रमाण अवगत होती हें मला जो त्यांचा सहवास झाला त्यांत मीं स्वतः अनुभविलें आहे. तोच गुण त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव नीलकंठ विनायक ऊर्फ कोंडोपंतदादा छत्रे यांचेमध्येंही उतरला होता, हेंही मला स्वतःला माहीत आहे. प्रो. चि. गं. भानू यांचे निर्दिष्ट केलेले ज्ञानप्रकाशमधील लेखाचे शेवटीं " चॅन्टींग, संस्कृत पद्यें रागदारींत म्हणण्याची पद्धती कोंडोपंतांनीं सुरू केली." "ह्या पुण्याच्या गोष्टी" "मुंबईसही नाटकाचे प्रयोग उत्तम झाले आहेत. " वगैरे म्हटलें आहे ह्यावरूनही कै. केरूनाना गायनविद्येंत मर्मज्ञ व रसिक होते हें सहजीं दिसून येईल. येवढेंच नव्हे तर सांगलीकर नाटक मंडळी मुंबईस गेली त्या पूर्वकाळीं त्यांचे प्रयोग पहाणेस कै. केरोपंत नाना व कै. कृष्ण-शास्त्री चिपळूणकर हे जोडीनें जात. कै. कृष्णशास्त्री हे पात्रांचीं भाषणें शुद्ध करून देऊन तीं वठवून घेत असत, त्यावेळीं सांगलीकराचे प्रयोग खुल्या जागीं होऊन त्यास त्या काळीं जाजमांचे पडदेही नव्हते; ती त्याकाळची " सरक पडद्याची सुधारणा कै. डॉक्टर भाऊ दाजी यांनीं करून दिली."

पूर्व कालीं—सांगलीकर नाटक मंडळी प्रथमच ज्या वेळीं पुण्यास आली त्या वेळीं नाटकगृह ( थिएटर ) पुण्यास मुळींच नव्हतें. सांग-लीकर नाटक मंडळीचीं पौराणिक नाटकें शनवारांत श्री. सांगलीकर यांच्या वाड्याचे पुढील मैदानामध्यें खुल्या जागीं होत असत व त्या प्रयोगास कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर, कै. केरूनाना छत्रे व पनवेलचे श्रीमंत पेढीवाले कै. आपासाहेब गुळवे हजर राहून नाटक मंडळीस अनेक सुधारणा सुचवून प्रोत्साहन देत असत. तीच परंपरा वरील रसिक व मार्मिक गृहस्थांनीं कै. अण्णा

किर्लोसकरांच्या संगीत नाटकाचे उदयकालापर्यंत पूर्ण सहानुभूतीनें राखली होती. सांप्रत सर्वच रंग पालटला असल्यानें ती मौज उरली नाहीं !

कै. गोविंद बल्लाळ देवल—संगीत शारदेचे जनक—हे कै. अण्णा साहेब किर्लोस्कर यांचे बेळगांवचे इंग्रजी शाळेंतील विद्यार्थी; नंतर ते संगीत नाट्यकलेचे त्यांचे पट्ट शिष्य झाले. "सौभद्र नाटका"चें कथानक त्यांनीं निवडून तें आपल्या प्रिय गुरूंस कथन केलें व तें त्यांस रुचलें आणि त्या आधारें कै. किर्लोस्करांनीं 'संगीत' सौभद्र लिहिण्यास सुरू केलें" असें कै. देवल यांजकडून मला समजलें. या गुरु–शिष्यांचा प्रेमाचा संबंध शेवटपर्यंत होता. जानेवारी १८८४ मध्यें किर्लोस्कर संगीत मंडळी नाशिक मुक्कामीं होती ह्या वेळीं कै. देवलही मंडळी-बरोबर होते. कोल्हापूरचे दिवाण माधवराव बर्वे व टिळक आगरकर केस संपूनही गेली होती. त्यासंबंधीं एक कथानक कै. देवल यांनीं योजिलें होतें. त्या केसच्या संधीस 'धूमकेतू'चा उदय झाला होता. तो प्रसंग साधून तें कथानक रचिलें होतें. त्या वेळीं 'पात्रांची योजना कशी केली आहेस' असा प्रश्न कै. किर्लोस्करांनीं कै. देवल यांस केल्यावर—कै. देवलांनीं सांगणेस सुरवात केली. त्या वेळीं सं. शाकुंतल, सं. सौभद्र,, रामराज्यवियोग हीं ३ नाटकें चालू होतीं. त्या सर्वांत सूत्र-धाराची भूमिका कै. अण्णाच स्वतः करीत असत. परंतु कै. देवल यांनीं बर्वे केसमधील नाटकांत सूत्रधाराची भूमिका कै. मोरोबा वाघोलीकरांकडे देऊन 'धूमकेतू' उदयाची भूमिका कै० अण्णासाहेब किर्लोस्करांकडे योजिली होती तें ऐकून अण्णासाहेब विनोदानें परंतु धिःकारयुक्त वाणीनें म्हणाले, काय ? धूमकेतु **मी** आणि गोंद्या ( कधीं प्रेमानें गोविंदा, गोविंदराव, क्वचित् गोंद्या ! असेंही म्हणत ) **तूंरे कोण** ? हीं प्रश्नोतरें होतांच कै. देवल त्यावेळीं न बोलतां उठून गेले ! कथानक संपलें ! या नाटकास देवल हे "**मदिरा**" हें नांव देणार होते. त्या प्रसंगीं मी स्वतः हजर होतों. देवलांचें "**मदिरा**"

**नाटक** जर रंगभूमीवर आलें असतें तर तेंही त्यांच्या सं. शारदा वगैरे नाटकांप्रमाणेंच लोकप्रिय झालें असतें.

कै. किर्लोस्कर हे संगीत नाटकांतील पात्रांची व पद्यांच्या चालींची आपल्या समोर हजर असलेल्या पात्रांची पात्रता व कोणाच्या गायनांतून कोणची चाल उठावदार व नादब्रह्म भरणारी योग्य होईल ती पात्रांचे अधिकार पाहून योजीत असत. म्हणून त्या वेळचीं त्यांचीं सं. सौभद्रादि नाटकें लोकप्रिय झालीं व तीं नाटकें अजूनही—त्यांत सं. सौभद्र हें सर्व 'जुन्या नव्या' चालू नाटकांत अग्रेसर, परिणामकारक व द्रव्यलाभदायक आहे. कै. किर्लोस्कर यांचे हयातींत व नंतर किर्लोस्कर सं. मंडळीस या सं. सौभद्राचे इतर नाटकांहून अधिक प्रयोग होत असल्यानें ह्याचें उत्पन्नही जबरदस्त वाढलें होतें. 'गंधर्वमंडळी' व 'यशवंत संगीत मंडळी' अजून ज्या वेळीं सं. सौभद्र नाटकाचे प्रयोग करते त्या वेळीं या नाटकावर प्रेक्षकांच्या उड्या पडतात. हें नाटक सन १८८२ सालीं रंगभूमीवर प्रथम आल्याचें १९२७ चे प्रस्तावनेंत लिहिलेंच आहे. आज ४७ वर्षें महाराष्ट्राचे चौथ्या पिढीसमोर हें नाटक एकसारखें चालू आहे ! कोणाचीही श्रीमंती—त्याचे तिसऱ्या पिढीमध्यें बहुधा नष्ट होते म्हणतात व तशीं शेंकडों उदाहरणें डोळयांसमोर आहेत; परंतु या 'संगीत सौभद्रा'ची श्रीमंती बहुतेक १८८२ सालाप्रमाणेंच सर्व प्रेक्षकांचे चौथ्या पिढीसमोर रंगभूमीवर आजही नटून थटून उभी आहे !

**रा. रा. शंकरराव मुजुमदार** यांनीं आरंभीं 'संगीत शाकुंतल' नाटक आपल्या रूपसंपन्नतेनें व अभिनयानें रंगविलें. तसेंच त्यांनीं या सं. सौभद्र नाटकांत रुक्मिणीची भूमिका घेऊन रंगविलें. मुजुमदार हे रुक्मिणी होऊन तुलसीवृंदावनासमोर येऊन उभे राहिले म्हणजे कोण्या गर्भश्रीमंताची गृहलक्ष्मीच रंगभूमीवर आली आहे असें प्रेक्षक त्यावेळीं आपापल्यामध्यें बोलत असत. रा. मुजुमदार हे कुलवधूस

शोभेल असा ठसठशीत कुंकुम तिलक लावून स्त्रीवेष व पोषाक हीं एखाद्या ब्राह्मण संस्थानिकाचे त्या वेळचे गृहलक्ष्मीबरहुकूम करीत असत. **कै. कोल्हटकर भाऊरावांनीं** पोषाक त्याच धर्तीवर चालू ठेवून आपल्या तडफदार झंकारयुक्त कंठमाधुर्यानें सुभद्रेची भूमिका अत्यंत उठावदार अशी शेवटपर्यंत राखल्यानें या सं. सौभद्रावर रसिक प्रेक्षकांच्या उड्या पडत असत. त्याकाळीं पुढील निदान पांच रांगांमध्यें विद्वान् पदवीधर, हायकोर्ट जज्ज वगैरे मंडळी असत. काशिनाथपंत तेलंग, माधवराव आपटे, गणपतराव किर्लोस्कर, बापूसाहेब आठले, सर महादेव चौबळ, कै० प्रोफेसर आबासाहेब काथवटे, केरो लक्ष्मण छत्रे, व गोविंदराव करकरे बार–ॲट–लॉ, माधवराव कुंटे, डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे इत्यादि विद्वद्रत्नें प्रेक्षकांमध्यें झळकत असत.

कै० भाऊराव कोल्हटकर हे जोंपर्यंत सुभद्रेची भूमिका करीत असत तोंपर्यंत मुंबई मुक्कामीं किर्लोस्कर मंडळी दरएक वेळीं फक्त **कुलीन स्त्रियांकरितांच** "संगीत सौभद्र अंक १ ते ५" या नाटकाचा प्रयोग स्वतंत्र करीत. या मुद्दाम केलेल्या सौभद्रास कु० स्त्रियांस जागा न मिळाल्यानें परत घरीं जाण्याचे प्रसंग येत. त्यावेळीं पुन्हां पुनः पुन्हा सं० सौभद्राचा प्रयोग मुद्दाम "**फक्त कुलीन स्त्रियांकरितां**" अशा ठळक अक्षरांच्या विस्तीर्ण जाहिराती मुंबईभर नाक्यानाक्यांवर चिटकवून प्रसिद्ध कराव्या लागत. अशी त्याकाळीं सं० सौभद्र नाटकावर कुलीन स्त्रिया व पुरुष मंडळींची भक्ति असे.

कै० अण्णांनीं सं० सौभद्राचे प्रथम ३ अंक झपाट्यानें रचिले; परंतु पुढील कथानक कसें संपवावें हें त्यांस सुचेना; त्यासाठीं त्यांनीं अनेक प्रयत्न केले. " माझी कविताशक्तिच नष्ट झाली कीं काय ?" असेंही ते आपले मित्र गणपतराव किर्लोस्कर, सर महादेव चौबळ यांचे जवळ बोलूं लागले. यावेळीं ते मुंबईस होते. तर एके दिवशीं सहज फोर्ट ( कोट ) मध्यें मुंबईस फिरावयास गेल्यावेळीं एका दुकानीं

गेले. तेथें त्यांस कांचेचीं अनेक तऱ्हेचीं "पेपरवेटस" टेबला-वरील दिसलीं. त्यांतच एक शुभ्र कांचेचा गणपती ३।४ इंच उंचीचा दिसला. त्यावर त्यांची नजर गेली. तो त्यांस फारच पसंत पडला. मुंबईचे दुकानदार चतुर व मालाची अनेकपट किंमत भकणारे असतात हें सुप्रसिद्ध आहे व हें खुद्द किर्लोस्कर जरी जाणत होते तरी ह्या गणपतीची दुकानदारानें जी किंमत जबर सांगि-तली ती त्यास तात्काळ देऊन तो गणपति घेऊन ते बिऱ्हाडीं आले. वाटेंत येतां येतांच सं. सौभद्राचे पुढील ४ थे व ५ वे अंकाचे कथानकाची गर्भधारणा हा खुद्द त्यांचाच शब्द आहे ! ) सुरू झाली ! त्यानीं बिऱ्हाडीं येऊन हा कांचेचा गणपती चांदीचे प्रभाव-ळींत बसवून समोर ठेवून चौथा अंक लिहिण्यास सुरू केला व पुढें नाटक पुरें केलें. त्यावेळीं खुद्द अण्णासाहेब म्हणत कीं या वेळीं "या कथानकाचे कल्पनातरंग जे सुचूं लागले, जी त्यांनीं गर्दी उडविली ती कोठवर सांगावी ? जुनी कल्पना जाऊन नवी कल्पना पुढें उभी राही या कल्पनातरंगांत संविधानक व पद्यांच्या गोड चाली नव्या नव्या सुचतात" याप्रमाणें संगीत सौभद्र नाटकाचे शेवटचे २ अंक ( ४ था व पांचवा ) साऱ्या आठ दिवसांत त्यांनीं पुरे केले. ज्या गणपतीच्यामुळें हें नाटक पुरें झालें त्यास ते 'सौभद्र गणपति' म्हणत.

कै. अण्णासाहेबांचें तिसरें नाटक "सं. रामराज्यावियोग." हे नाटक सन १८८४ च्या मे मध्यें कै. किर्लोस्कर यांनीं पनवेल येथें लिहिणेस हातीं घेतलें. ह्या वेळीं मी किर्लोस्कर संगीत मंडळीचा पहिला म्यानेजर म्हणून कै. अण्णांचे संन्निध असल्यानें त्या सं. रामराज्यवियोगाची प्रस्तावना लिहिण्याचा प्रसंग सांधल्यास तो इतिहास त्या काळाचा म्हणून पुष्कळच लिहितां येईल. तो सुयोग येईल तो सुदिन ! !

किर्लोस्कर मंडळीच्या त्या वेळच्या संगीत नाटकांच्या प्रयोगांमध्यें मुख्य मंडळी ज्या भूमिका घेत त्या खालीलप्रमाणें बहुधा असत.

## संगीत सौभद्र.

| | |
|---|---|
| कै. किर्लोस्कर— | सूत्रधार, बलराम. |
| " मोरोबा वाघोलीकर— | अर्जुन. |
| " बाळकोबा नाटेकर— | कृष्ण, नारद. |
| " भाऊराव कोल्हाटकर— | सुभद्रा. |
| " गोविंदराव निपाणीकर— | घटोत्कच. |
| " काशिनाथपंत परचुरे— | विदूषक. |
| रा. शंकरराव मुजुमदार— | रुक्मिणी. |

## संगीत रामराज्यवियोग.

कै.किर्लोस्कर— सूत्रधार, दशरथ, ( कधीं ) विनत.
" मोरोबा— वासिष्ठ.
" बाळकोबा— विनत,शंबूक, ( कधीं ) वसिष्ठ.
" भाऊराव— मंथरा.
" भास्कर बखले— कैकेयी.
( नंतर प्रसिद्ध गवई भास्कर बोवा बखले )
रा. त्र्यंबकराव साठे— सुमंत.

वरील ‘ सौभद्र गणपती ’ प्रमाणें आणखी एका देवाचें वैशिष्ट्य देणें अयोग्य होणार नाहीं. हा देव म्हणजे किर्लोस्करांचा श्रीकलमेश्वर.

सन १८८२ । ८३ चे सुमारास किर्लोस्कर संगीत मंडळी कै. श्री. शिवाजीराव बाळासाहेब होळकर यांचे आश्रयानें असल्या वेळीं मंडळी उज्जैनीस गेली होती. त्या वेळीं मंडळीचे नोकरींत श्रीधरभय्या नांवाचा एक वाढपी होता. त्या प्रांतांतील अन्य लोकांप्रमाणें भांग वांटून पिणेचें व्यसन त्यास होतें. तो नित्य क्षिप्रा नदीवर स्नानास जात असे. या नदीचे घाटाच्या पायऱ्यांचे पाण्यालगतचे दगड नित्य स्नानास

जाणारांनीं भांग वाटून खोलगट केलेले आहेत. त्या वेळीं श्रीधरभय्यानें उज्जैनीची प्रसिद्ध पत्ती (भांग) नित्य खूपच झोडणेचा क्रम ठेवला होता. नदीकांठीं अनेक लहान लहान शिवमंदिरें आहेत. त्यांपैकीं एका मंदिरामध्यें शाळुंखेवर घट्ट बसविलेला एक सुंदर बाण या श्रीधरभय्याचे दृष्टीस पडला व तो त्यास देव म्हणून फार आवडला नसून उज्जयनीची पत्ती ( भांग ) डोळयांतदेखील खुपूं नये इतकी बारीक वांटण्यास योग्य पाषाण म्हणून आवडला. तो त्यानें एक सारखी त्रिरात्र हलवून काढण्याचा प्रयत्न करून चालविला. हे गृहस्थ तरुण, सशक्त, आणि ताकददार होते. परंतु हा महादेव त्यांस हस्तगत करण्यास फारच श्रम करावे लागले. तो बाण त्यानें कोणासही न सांगतां व न दाखवितां भस्माचे झोळींत घालून मंडळीबरोबर इंदोर येथें आणला.

इंदोरास कोणाची भीति नाहीं असें त्यानें पाहून बरोबर उज्जैनीहून आणलेली पत्ती ( भांग ) या प्रासादिक बाणानें वांटून दूध, मसाला वगैरे घालून खूप छाणून तयार केली. या प्रसादाचा लाभ मंडळींतील सर्वांस दिला व त्याबरोबर कै. अण्णासाहेबांसही दिला. आणि त्याबरोबरच उज्जैनीहून आणलेला बाण त्यांनीं अण्णासाहेबांस मोठ्या प्रेमानें दाखविला. या गोष्टीचें अण्णासाहेब कौतुक करतील असें श्रीधरभय्यास वाटलें होतें. परंतु त्याची पूर्ण निराशा झाली ! तो बाण अण्णासाहेबांनीं त्याचेपासून घेऊन भक्तिपूर्वक व लक्षपूर्वक पाहून श्रीधरभय्यास त्याचे कृत्याबद्दल खूपच दोष दिला. आणि तो त्यांच्या गुर्लहोसूर गांवचा महादेव श्री. कलमेश्वरच या भावनेनें किर्लोस्कर मंडळीचे देवांमध्यें त्यांनीं त्याची स्थापना केली. त्यास उत्तम चांदीचा नाग कारागिराकडून तयार करवून आणून त्याचे फणीखालीं त्याची स्थापना त्याचे अंगाचे वेटाळयामध्यें केली. तेव्हांपासून त्याची नित्यपूजा व महाशिवरात्रीस यामपूजा ( रात्रीचे ४ प्रहरांच्या ज्या चार पूजा करतात त्या ) महापूजा करणेचा सांप्रदाय पडला. शेवटीं तो बाण किर्लोस्कर मंडळीचे मालक रा. शं. बा.

मुजुमदार यांचेकडून अन्य नाटक मंडळीकडे भ्रमण करीत करीत तो हल्लीं महाराष्ट्र कोकीळ सरनाईक यांचे यशवंत संगीत मंडळीमध्यें आहे. या बाणावर कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांची विशेष भक्ति असे. अण्णासाहिबांना शंकराची भक्ति विशेष असे. **सौभद्र गणपतीचा** उत्साह भाद्रपदमासीं किर्लोस्कर मंडळीमध्यें मोठ्या थाटानें होत असे. त्याचप्रमाणें या श्री. **कलमेश्वराची** पूजा स्वतंत्र ब्राह्मण पुजारी ठेवून शेवटपर्यंत होत होती. ती परंपरा गंधर्व संगीत मंडळींत चालू होती.

किर्लोस्कर संगीत मंडळी ही पुण्यांतील अन्य संस्थांप्रमाणें प्रारंभापासून एक संस्था होती व त्यामुळें तिच्याबद्दल लोकांमध्यें पुष्कळ कालपर्यंत प्रेम वसत होतें. या संस्थेशीं अनेक लोकांचा अनेक तऱ्हेचा संबंध आला होता. या संस्थेचा व तिच्या संस्थापकांचा कांहीं पूर्वेतिहास माहीत असलेला पुढील पिढ्यांना परिचित व्हावा म्हणून लिहून वाचकांस **आर्यभूषण** छापखान्याच्या चालकांच्या सहानुभूती-मुळें प्रसिद्ध केला आहे. या माहितीबद्दल सर महादेव चौबळ यांचा खालील अभिप्राय त्यांनीं हस्तलिखितें वाचून दिलेला मुद्दाम या खालीं दिला आहे.

At the request of my friend Mr. Trimbakrao Sathe I have gone through this supplementary preface written by him. The old incidents of more than 40 years back referred to by him are according to my recollection fairly correct, and will perhaps be found to be interesting by persons who may be curious to know how the Marathi Sangit drama developed on the stage.

सर महादेव यांनीं मीं लिहिलेल्या चार वेड्यावांकड्या गोष्टी वाचून वरील अभिप्राय दिला याबद्दल त्यांचे आभार मानून लांबलेलें टिपण पुरें करतों.

पुणें. ता. १५।९।२९

---

# प्रकाशकाचे दोन शब्द.

रा. रा. त्रिंबक नारायण साठे यांचा किर्लोस्कर नाटक मंडळीशीं जवळ जवळ तिच्या प्रारंभापासून निकट संबंध असल्यामुळें त्यांनीं सदर कंपनीचे संस्थापक व सदर कंपनी आणि त्यांचीं नाटकें याबद्दल आमच्या विनंतीवरून गोळा केलेली माहिती प्रसिद्ध होणें इष्ट वाटले-वरून तो उपोद्घात म्हणून या आवृत्तींत दिला आहे. रा. रा. शंकरराव मुजुमदारांप्रमाणेंच रा. त्रिंबकराव साठे यांचा किर्लोस्कर कंपनीशीं जिव्हाळ्याचा संबंध फार दिवस असल्याकारणानें त्यांना सदर कंपनीच्या संस्थापकांबद्दल व त्यांच्या कर्तबगारीबद्दल आदरयुक्त प्रेम वाटणें साहजिक आहे. रा. साठे यांनीं चित्रें व माहिती स्नेहसंबंध लक्ष्यांत घेऊन मिळवून दिली याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे. **आर्यभूषण** छापखान्याकडे कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या दोन नाटकांची मालकी कोणत्या कारणानें आली याचा त्रोटक इतिहास रा. साठे यांनीं दिला आहे. **आर्यभूषण** छापखान्याला मध्यंतरीं या मालकीच्या बाबतींत कोर्टांत जाऊन छापखान्याचा या दोन नाटकांवरील हक्क शाबीत करून घ्यावा लागला होता. रा. साठे यांनीं सदर वेळीं आम्हांस अशीच मदत केली होती. **आर्यभूषण** छापखान्याशीं किर्लोस्कर कंपनीचा उच्च स्वरूपाच्या भावनेच्या प्रेरणेनें आलेला संबंध कायम रहावा हें योग्यच आहे. रा. साठे यांच्या मदतीबद्दल आणखी एकवार आभार मानून हे ‘दोन शब्द’ पुरे करतों.

आर्यभूषण छापखाना, पुणें.
ता. १।१।१९३० } **प्रकाशक.**

# संगीत शाकुंतल नाटक.

## अंक १ ला.

**पद**--राग खमाज, ताल धुमाळी.

**चाल**--जय श्रीरमणा भवभयहरणा.

**पंचतुंड नररुंडमालधर पार्वतीश आधीं नमितों ॥ विघ्नवर्गनग भग्न कराया विघ्नेश्वर गणपति मग तो ॥ पंच० ॥ ध्रु० ॥ कालिदासकविराजरचित हें गानीं शाकुंतल रचितों ॥ जाणुनियां अवसान नसोनि महत्कृत्यभर शिरिं घेतों ॥ ईशवराचा लेश मिळे तरि मूढ यत्न शेवटिं जातो ॥ या न्यायें बलवत्कवि[illegible]वाक्पुष्पीं रसिकार्चन करितो ॥ पंचतुंड नर० ॥**

[ सूत्रधार प्रवेश करितो. ]

**पद**--राग कालंगडा, ताल धुमाळी.

**चाल**--भिमातिरीं एक वसविलें नगर.

**अष्टमूर्ति परमेश सदाशिव तुम्हां शिव देवो ॥ यद्रूपाविण विश्व न हा विश्वास हृदयीं भरवो ॥ अष्ट० ॥ ब्रह्मोत्पत्तीपूर्विल जें जलरूप तोचि जाणा ॥ विधिहुतहवि धारण करणारा तोचि अग्निराणा ॥ हवि, होता, रवि, शशि, नभ, भूमि, वायू तोचि ह्मणा ॥ ऐशा या तनुंचा स्वामी तो दुरित सर्व पळवो ॥ अष्ट० ॥**

**सूत्रधारः**— ( पडद्याकडे पाहून ) प्रिये, जर पडद्यांतील काम आटपलें असेल, तर घटकाभर इकडे ये.

[ नटी प्रवेश करिते. ]

**नटीः**— प्राणनाथ ही आलें. आज कोणता खेळ करायचा त्याची आज्ञा करावी.

**सूत्रधारः—**

साकी—( राग जोगी, ताल धुमाळी. )

**सकलकलागुणवेत्ते पंडित आज सभेमधिं असती ॥ यांना तोषावया पाहिजे कालिदासकविसुकृती ॥ दुष्कर बहु आहे। सखये रंगस्थल पाहें ॥ ह्मणुनि सांगतों भलती सलती व्यर्थचि नाटकरचना॥ अभिज्ञानशाकुंतल तत्कृति दावुनि सुखवूं यांना ॥ पात्रें तीं सजवीं ॥ माझा चिंताग्नि विझवीं ॥**

**नटीः—** प्राणवल्लभा,

**श्लोक**—कामदावृत्त.

राग आलैयाबिलावल, ताल धुमाळी.

**खेळ चांगला वेषधर बरे । असलियावरी काय भय बरें ॥**
**थोर तूमचो नाट्यकल्पना । विदित ती असे या महाजनां ॥**

**सूत्रधारः—** [illegible]े, असें जरी आहे तरी त्यांतील तुला मर्म सांगत ऐक—

दिंडी—राग लीलांबरी, ताल दादरा.

**पंडितांना संतोष होय तो कीं ॥**
**न वद मजला तूं कुशल नाट्यपाकीं ॥**
**जरी मानव तय्यार होय खासा ॥**
**तरी आत्मीं मन धरी अविश्वासा ॥**

**नटीः—** होय तसेंच कां होईना; पण आतां पुढें काय करावया त्याची आज्ञा व्हावी.

**सूत्रधारः—** या सभाजनांच्या कानांस तृप्त करणाऱ्या संगीतावांच दुसरें काय ? याकरितां थोडें गायन कर.

**नटीः—** गायन करण्याविषयीं आज्ञा होत आहे, पण कोणत्या ऋतु वर्णन करून गायन करूं बरें ?

**सूत्रधारः—** सखे, नुक्ताच लागलेला व विविध उपभोगांना यो अशा ह्या ग्रीष्म ऋतूला उद्देशून गायन कर. पहा या ऋतूंत काय मौ आहे ती—

**सवाई**—राग धुमाळी, ताल दाद्रा.

**शीत उदकीं आंघोळ । करूं होत उतावीळ ॥**
**वृक्षछाया सोज्वळ । फार वेळ झोंप दे ॥**
**अस्तमानीं आनंद। वायु सुटत मंद मंद ॥**
**कुसुमपाटलसौगंध । घम्‌घमाट सूटती ॥**

**नटी**:— बरें तर गायन करतें.

**ठुंबरी**—राग खमाज, ताल पंजाबी ठेका.

**चाल**— दधुबेचन मैं ना जाऊं दय्यां.

**आज मज सहज आला उल्हास ॥ स्फुरण हृदयिं घडे कसें गायनास ॥ आज मज० ॥ ध्रु० ॥ ऋतू ग्रीष्म कसा उडवि बहारी ॥ अधिं तपवि सुखवि खास ॥ आज० ॥ १ ॥ फुलें केसरीचीं मधुपविचुंबित ॥ स्वशिरिं घालिति दाविति पतिस ॥ आज० ॥२॥ निशीं चांदण्यांत कामिनि करितात॥ हसत खेळत सुखविलास ॥ आज० ॥ ३ ॥**

**सूत्रधारः**—वाहवा वाहवा ! फार उत्तम गायन केलेंस ! तुझ्या या मधुर गायनाकडे चित्तवृत्ति गुंगून गेल्यामुळें सर्व सभा चित्राप्रमाणें होऊन गेली. तर आतां कोणतें नाटक करून यांना संतोषवावें बरें ?

**नटी**:— महाराज, हें काय ? मघांच नाहीं का आपण सांगितलें, कीं अभिज्ञानशाकुंतल नाटकाचा खेळ करायचा म्हणून ?

**सूत्रधारः**— प्रिये, बरी आठवण केलीस. या वेळीं मला अगदींच विसर पडला होता. कसा जर म्हणशील तर—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**तुझ्या मधुर गानाच्या नादें वेडावुनि हा गेला ॥**
**जसा भूप दुष्यंत पहा हा हरिणें ओढुनि अणिला ॥**
**जाऊं चल भार्ये । आम्हां असतीं बहु कार्यें ॥**

[ सूत्रधार व नटी जातात. ]

**[ ही प्रस्तावना झाली. ]**

[ तदनंतर हरिणामागें लागलेला सारथ्यासह दुष्यंत राजा रथांत बसून प्रवेश करितो. ]

**सारथीः**— ( राजाकडे व मृगाकडे पाहून )

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**दौरत है मृग चली आपकी मूरत धनुख चढाके ॥**
**छब दिखती ये हरन पिछे जौं शिवजी जंगल भटके ॥**
**तारिफ करनेकूं । अक्कल नहि ये बंदेकूं ॥**

**राजाः**— सूता, या हरिणानें आम्हांला बरेंच लांब आणिलें; आणखी किती दूर जावें लागणार आहे हें कांहीं कळत नाहीं.

**पद**— राग बिहाग, ताल दीपचंद.

**काय वेटत्या हरिणाची मजा तरि वायुगती पळतो ॥ पहा रे ॥**
**मुरडुनि वरचेवर रथ बघतां किति सुंदर दिसतो ॥ पहा रे ॥ ध्रु०॥**
**बाणभयें मागिल तनु पुढतीं अवळुनि कशी धरितो ॥ पहा रे ॥**
**बहु थकला मुख पसरुनि चर्वित तृण गाळित जातो ॥ पहा रे ॥**
**चारी पद पोटासि धरुनि मग चेंडुपरी उडतो ॥ पहारे ॥ वाटे जातो ॥ नभपंथेंची भूमिस नच शिवतो ॥ पहा रे ॥ काय० ॥**

( चकित होऊन ) अरे आपण मागोमाग जात असून मृग इतक्यांत दिसतो न दिसतोसा झाला !

**सारथीः**— अजि महाराज, अबतक् रस्ता बहुत खांचखड्डेका था, इसेलिये घोडोंके बागद्वाल जोरसे खेंचकर रथ धीरे धीरे चलाया. इस्‌वास्ते यह हरन आपसे दूर रहा. वाहवा ! देखो सरकार अब रस्ता बहुत सफा मिला, अब उस्को पकडनेको देर नहि लगेगी.

**राजाः**— असें काय, तर मग घोड्यांचे दोर सैल सोड पाहूं.

**सारथीः**— जो हुकूम ( रथास वेग देऊन ) महाराज, बागद्वाल ढिले करनेमे ये तुरंग पवनके माफक चलरहे है—देखो—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**छाति पसारे कान उठाया कलिग न हाले शिरकी ॥**

**चरन धूलिकुभी मिलन न दे क्या ईर्षा आई मृगकी ॥**
**देखो राजाजी ॥ कैसे चलते ये तेजी ॥**

**राजाः**— खरोखर सूर्याच्या व इंद्राच्या घोड्यांलाही हे घोडे जिंकतील यांत संशय नाहीं. रथवेगामुळें माझी कशी स्थिति झाली आहे पहा—

**पद**—राग हमीर कल्याण–धुमाळी.

**लहान वस्तु ती स्थूल दिसली ॥ तुटकी वाटे कुणि जुडली ॥**
**सहजकुटिला सरला झाली ॥ जवळि न बाजुस अथवा आतां दूर न मज कांहीं ॥**

पहा आतां याला ठार मारून टाकतों. ( बाणाचा नेम धरितो. )

[ पडद्यांत शब्द होतो. ]

**ओंवी**–राग मल्हार.

" **हां हां दुष्यंत भूपाला, आवरी रे बाण आपुला,**
**आश्रमींच्या हरिणबाला, व्यर्थ मारूं नको रे ॥**"

**सारथीः**— ( ऐकून व पाहून ) सुनो मालिक, आपने इस् हरनके उपर बान चढाया; लेकिन दरम्यान्मे कितने एक बम्मन आके खडे रहे है.

**राजाः**— ( अंमळ घाबरून ) असें काय, तर रथ उभा कर बरें !

**सारथीः**— जो हुकूम ( रथ उभा करितो ).

[ तदनंतर दोन शिष्यांसह वैखानस येतो. ]

**वैखानसः**— (" हां हां दुष्यंत भूपाला॰ " पूर्वोक्त ओंवी पुनः म्हणून.)

**पद**—राग आनंदभैरवी, ताल धुमाळी.

**चाल**—बारे बिभीषण बोलतसे.

**शशिकुलभूषण गुणवंता ॥ ऐकें मद्वच दुष्यंता ॥ ॥ ध्रु० ॥ अग्नी पुष्पांवरि जैसा ॥ टाकुं नको शर मृगीं तैसा ॥ कोठें मृदुतनु मृग ऐसा । कोठें बाण तुझा पविसा ॥ यास्तव आंवरि नेम कसा । तपोवनिं न करीं हें सहसा ॥ चाल ॥ पीडितजनदुःखासि हराया शस्त्रें श्रीमंता ॥ असतीं तव बा बलवंता ॥**

**राजाः**—गुरुवर्य, आज्ञेप्रमाणें हा बाण काढून घेतला.

**वैखानसः**—पुरुवंशांतल्या कुलदीपकाला हेंच योग्य आहे.

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**जन्म ज्याचा पुरुवंशिं असे झाला ॥**
**असें करणें हें योग्य असे त्याला ॥**

( वर हात करून )

**तूज ऐसा सद्गुणी पुत्र होवो ॥**
**चक्रवर्ती पद तया प्राप्त होवो ॥**

**दोन्ही शिष्यः**— ( वर हात करून ) राजा, खरोखर तुला चक्र-वर्तीच पुत्र होईल.

**राजाः**— ( नमस्कार करून ) तथास्तु महाराज.

**वैखानसः**— राजा, समिधा आणण्याकरितां आम्ही निघालों आहों. हा मालिनी नदीच्या तीरीं कण्वमहर्षींचा आश्रम दिसत आहे. जर तुला अन्य कार्य नसेल तर तिकडे जाऊन अतिथिसत्कार घेणें योग्य आहे. आणखी—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**रम्य आणि निर्विघ्न अशीं ऋषिकर्में पाहुनि तुजला ॥**
**कळेल भूपा कोठवरी तव बाहु राखि या महिला ॥**
**आल्यावरि येथें ॥ जा नच गेल्याविण तेथें ॥**

**राजाः**— कुलपति कण्वमहर्षि आश्रमांत आहेत काय ?

**वैखानसः**— कोणी पाहुणे आले असतां त्यांचा सत्कार करण्याचें काम कन्या शकुंतलेला सांगून तिला कांहीं अनिष्ट ग्रह आले होते त्यांची शांति करण्याकरितां ते नुकतेच सोमतीर्थाला गेले आहेत.

**राजाः**— बरें तिलाच भेटूं; तिच्या मुखानें कण्वऋषींला माझी पूज्यबुद्धि कळून येईल.

**वैखानसः**— आम्ही येतों तर आतां.

[ वैखानस शिष्यांसह निघून जातो. ]

**राजा:**– सूता, घोडे चालीव, या पुण्याश्रमाच्या दर्शनानें आत्म्याला पवित्र करूं.

**सारथी:**—जो हुकूम. ( रथ चालवितो )

**राजा:**— ( चहूंकडे पाहून ) सूता, हा प्रदेश तपोवनाचा आहे, हें सांगितल्यावांचून कळत आहे. पहा,—

**अंजनीगीत**—राग झिंजोटी, ताल धुमाळी.

**शुकचंचूंतुनी वृक्षाखालीं । राजगिऱ्याचीं कणसें पडलीं ॥ इंगुदि फोडुनी चिकट जहाली ॥ उपलत तीं बघ हीं ॥ १ ॥ विश्वासास्तव हरिण न भीति । वल्कें धुउनी नेतांना तीं ॥ विहिरीच्या मार्गावरि दिसती । रेखा उदकाच्या ॥ २ ॥ पवनचपल पाटाचें पाणी । झुळझुळ वाहे तरुमूलांतुनि । पल्लवकांती गेलि फिरोनी । धूम्रें होमाच्या ॥ ३ ॥ बघ इकडे या उपवनभागीं । दर्भ कापुनी नेल्या जागीं ॥ हरिणबालकें बघण्याजोगीं । खेळाति आनंदें ॥ ४ ॥**

**सारथी:**— सरकार, सब बराबर है.

**राजा:**— ( कांहींसा पुढें जाऊन ) सूता, आश्रमांतल्या ऋषींना त्रास होईल याकरितां रथ येथेंच उभा कर. मी खालीं उतरतों.

**सारथी:**—खडा किया सरकार.

**राजा:**—( उतरून ) सूता, तपोवनांत नम्रवेषानेंच गेलें पाहिजे, याकरितां हें घे. ( अंगावरील दागिने, शेला व धनुष्य देतो. ) सूता, ऋषींचें दर्शन घेऊन मी परत येईपर्यंत या घोड्यांना पाणी पाजून थोपटून थापटून हुषार करून ठेव.

**सारथी:**— जो हुकूम. ( रथासह निघून जातो. )

**राजा:**— ( इकडे तिकडे हिंडून पाहून ) हेंच आश्रमाचें द्वार, तर आतां प्रवेश करावा. ( प्रवेश करून ) अरे, माझा उजवा बाहु कां बरें स्फुरण पावतो ?

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**शांतिस्थल हें बाहुस्फुरणें फळ कैसें तें मिळतें ॥**

**अथवा भवितव्यद्वारें चहुंकडे दैव फळफळतें ॥**
**शंका कां घ्यावी । विधिचीसत्ता ती पहावी ॥**

[ पडद्यांत– " सख्यांनो, इकडे या ग इकडे या. " ]

**राजा:**— ( कान देऊन ) अरे, बागेंत दक्षिणेच्या बाजूस कोणी बोलत आहेत; तिकडेच जावें. ( हिंडून पाहून ) अरे या तपस्वि-कन्यका आपापल्या वयाप्रमाणें लहान मोठ्या घागरी कडेवर घेऊन लहान लहान झाडांना पाणी घालीत इकडेच येत आहेत. ( निरखून पाहून ) काय यांचीं स्वरूपें सुंदर आहेत तरी !

**पद**— राग लीलांबरी, ताल धुमाळी.
**चाल**— बाळा ह्मणसी पाणी रे पाणी.

**किती मधुर रूप तरि यांचें । मम नेत्र धन्य अजि साचे ॥ नृपमंदिरीं यापरि कैचें । वन हरी सत्व बागेचें ॥ किति वर्णु येइना वाचे । ह्या बघतां कामि न वांचे ॥ हळुंहळुं चमकति बागेंतुनीया । विद्युल्लता तशा या ऋषिजा ॥ भाग्योदय माझा ॥**

आतां या छायेखालीं उभें राहून यांची वाट पाहूं.

( वाट पहात उभा राहतो. )

[ तदनंतर दोन सख्यांसह शकुंतला प्रवेश करिते. ]

**शकुंतला:**— सख्यांनो, चला इकडे या.

**अनसूया:**— गडे शकुंतले, मला असें वाटतें, काश्यपबाबांची प्रीति या आश्रमांतल्या वृक्षांवर तुझ्यापेक्षां अधिक आहे. कारण तूं जाईच्या फुलापेक्षां सुकुमार असतां, त्यांनीं या झाडांना पाणी घालण्याचें काम तुला सांगितलें आहे.

**शकुंतला:**— केवळ कण्वबाबांच्या आज्ञेवरूनच मी हें काम करितें असें समजूं नको. हीं झाडें माझ्या सख्ख्या भावंडांप्रमाणें मला आवड-तात. ( झाडांस पाणी घालते. )

**राजा:**—( काय ? हीच का ती कण्वकन्या शकुंतला !) खचित त्या कण्वमहर्षीला कांहीं समजत नाहीं. पहा, तो हिला या आश्रमांतलीं कष्टाचीं कामें करायला लावितो.

पद— राग कालंगडा, ताल धुमाळी.

**तनु ईची सुंदरा । सहजमनोहरा । भूषणकारण नच इस जरा । कायही जातीची अप्सरा ॥ पंकजकोमलतरा । अशा या करा । लावी कामा जो खडतरा । भासतो अविचारी मज खरा ॥ वाटे मज हा मुनी ॥ शस्त्र म्हणउनी । तोडिल कमलदलें शमिवनीं ॥ शंका न करिल किमपि मनीं ॥**

असो, या झाडाच्या आड उभें राहून, मोकळया मनानें या आपआपल्याशीं काय बोलतात तें लपून ऐकावें. ( तसें करितो. )

**शकुंतलाः—** सखे अनसूये, या वल्कलांची गांठ प्रियंवदेनें भारीच बाई घट्ट बांधली आहे, त्यानें मला कसें जखडल्यासारखें झालें आहे, तर एवढी अम्मळ सैल कर पाहूं !

**अनसूयाः—** बरें. ( सैल करते. )

**प्रियंवदाः—**( हंसत ) सखे, तुझें तारुण्य घटकोघटकीं तुझ्या अवयवांना वाढवीत आहे; म्हणून ही वल्कलांची चोळी आवळ झाली असेल, तर त्या यौवनाला दोष दे. मला काय म्हणून ?

**राजाः—** ही अगदीं खरें बोलली.

पद— राग झिंजोटी, ताल त्रिवट.

**लोपविली बहुत शोभा या स्त्रीची वल्कलें ॥**
**जाईचें पुष्प जेविं सितपर्णें झांकिलें ॥**
**हृदयाच्या उच्च भागावरतींही पसरिलें ॥**
**घेवोनी स्कंधदेशीं गांठोनी सोडिलें ॥**

अथवा, जरी हिच्या या सुंदर देहाला हें वल्कल अगदींच अयोग्य आहे, तथापि तो एक अलंकारच झाला आहे. कारण,—

पद—राग झिंजोटी, ताल, त्रिवट

**शैवालें युक्त जैसें पंकज तें शोभतें ॥**
**शशिमाजीं लांछनाची बहु शोभा दीसते ॥**
**तैसी ही वल्कलानें किती नामी वाटते ॥**
**(जातीच्या सुंदरांना कांहींही चालतें ॥)**

**शकुंतलाः**— ( पुढें पाहून ) सख्यांनो, ह्या केसरवृक्षाचीं पानें वाऱ्यानें हालत आहेत, यावरून जणुंकाय तो मला आपल्याकडेच बोलावितो आहे असें वाटतें; तर तिकडे जाऊन त्याचा समाचार घेतें. ( जाते. )

**प्रियंवदाः**— सखे शकुंतले, घटकाभर तेथेंच उभी रहा.

**शकुंतलाः**— काय म्हणून ?

**प्रियंवदाः**— तूं त्या वृक्षाजवळ वेलीप्रमाणें शोभत आहेस म्हणून.

**शकुंतलाः**— सखे, म्हणूनच प्रियंवदा म्हणजे गोडबोली असें तुला म्हणतात तें उगीच नाहीं.

**राजाः**— केवळ गोड बोलली असें नव्हे, ही अगदीं खरेंही बोलली. अरे ही वेलच आहे. पहा—

**पद**—राग ललितागौरी, ताल धुमाळी.

**चाल**—जनहो श्रीपादपदीं मन ठेवा.

**(नोहे नारी ही चंचल वल्ली)॥ मति माझी ठसली ॥ काय म्हणावें इस ही होती शंका सखिनें ती घालविली ॥ नोहे नारी० ॥ ध्रु० ॥ असती लुसलुशीत ओष्ठ इयेचे ॥ पल्लव वेलीचे ॥ बाहू अति कोमल गोंडस साचे ॥ ढापे लतिकेचे ॥ अंगीं यौवनभर भरला तीचे ॥ पुष्पचि नवतीचें ॥ ऐशी चालकि बोलकि लतिका निर्मुनि विधिनें कमाल केली ॥ नोहे नारी ही० ॥**

**अनसूयाः**— सखे शकुंतले, ही आम्रवृक्षाची स्वयंवर स्त्री, जिचें तूं वनज्योत्स्ना म्हणून नांव ठेविलेंस, अशा त्या मोगरीच्या वेलीस विसरलीस का ? तिला नाहीं का पाणी घालायाचें ?

**शकुंतलाः**— मला माझा विसर पडेल, पण तिला नाहीं हो मी विसरणार ( वेलीजवळ जाऊन पाहून ) गडे ! खरेंच,

**पद**—राग काफी जिल्हा, ताल त्रिवट.

कान्हाबनसीवालेनें घागरिया फोरीरे, या चालीवर.

**( वृक्षवेल या दोहींची जोडि शोभते ॥ कशि ही, जोडि ॥ ध्रु० ॥ )**

**सुनवकुसुमतारुण्यानें दिसत ही तरुणीपरी ॥ पल्लवी पुरुषचि भासे आम्रतरु सुंदर मातें ॥ वृक्ष० ॥ १ ॥***

( पहात उभी राहते. )

**प्रियंवदाः**— अनसूये, वनज्योत्स्नेकडे शकुंतला इतकें लक्ष लावून कां पाहते आहे याचें कारण तुला कळलें का ?

**अनसूयाः**— नाहीं बाई, कां पाहते आहे सांग बरें.

**प्रियंवदाः**—जशी वनज्योत्स्ना आपल्या योग्य जो आम्रवृक्ष त्यास मिळाली, तशी मीही माझ्या पतीशीं कधीं मिळेन म्हणून.

**शकुंतलाः**— हें सगळें तुझ्याच मनांत आहे. (वेलीस पाणी घालते.)

**राजाः**— हिचा जन्म कण्वाच्या विवाहित स्त्रीपासून झाला नसावा; बहुतकरून ही अन्यवर्णाच्या स्त्रीच्या उदरीं कण्वापासून झाली असावी अथवा संशय नकोच—

**पद**—राग लीलांबरी, ताल धुमाळी.

**चाल**— भक्तासाठीं तो जगजेठी बैसुनी.

**ब्राह्मणकन्या नव्हे क्षत्रिया खरी योग्य कामिनी ॥**
**झाला निश्चय माझ्या मनीं ॥**
**अति श्रेष्ठ मम मन इजवरती जात धांव घेउनी ॥**
**अपात्रीं बघत न जें ढुंकुनी ॥**
**साधूंना ये संशय कवण्या वस्तूच्या चिंतनीं ॥**
**ठरविती मनोवृत्ति पाहुनी ॥**

तथापि हिची आमची भेट झाल्यावर ही कोण आहे हें कळेलच.

**शकुंतलाः**— ( घाबरून ) अगबाई, वेलीला पाणी घालतांच हा

---

* हा वृक्षाचा आणि वेलीचा जोडा मोठा योग्य वेळीं जुळला. या वेलीला जो फुलांचा नवीन बहार आला आहे, तेंच तिचें तारुण्य, आणि या आम्रवृक्षाला नवीन पल्लव फुटल्यानें तो सुद्धां मोठ्या उपयोगी पुरुषासारखा दिसत आहे. ( प० आवृ० )

भ्रमर वेलींतून निघून माझ्या बाई तोंडाभोंवतीं घिरट्या घालूं लागला. काय तरी करूं ? ( भ्रमरबाधेचा अनुकार करिते. )

**राजाः**— ( लोभानें ) काय या भ्रमराचें भाग्य तरी !—

पद—राग कलंगडा, ताल धुमाळी.

**वीरा भ्रमरा, जन्मुनि सार्थक केलें तूं या जगीं ॥**
**बसलों विचारांत आह्मि उगी ॥**
**या प्रमदेच्या वक्रकटाक्षा पात्र होसि तूं गड्या ॥**
**अमुच्या गप्फा मानिं कोरड्या ॥**
**कांपत थरथर तिज वरि टाकिशि सरसाउनियां उड्या ॥**
**कर्णीं कथिसि गोष्टि संवगड्या ॥**
**झिडकारित असतां निज हस्तें मानेनें वांकड्या ॥**
**पीशी अधरामृत फांकड्या ॥**
**ईच्या जातीची ती शंका काढुनि मानिं वाउगी ॥**
**बसलों विचारांत आह्मि उगी ॥**

**शकुंतलाः**— हा दांडगा नाहीं ऐकत, दुसरीकडे तरी जावें. ( भ्रमराकडे पाहून ) काय इकडेही माझ्या पाठीला लागून आला ! ( घाबरून ) सख्यांनो, सोडवा ग मला सोडवा ! पहा, या दुष्ट भुंग्यानें कशी माझी पाठच घेतली आहे.

**प्रियंवदाः**–( हंसून ) अग आम्ही सोडविणार कोण? दुष्यंत राजाला हाक मार. कारण तपोवनांतलीं संकटें राजानेंच दूर करावयाचीं.

**राजाः**–(स्वतःशीं) आतां ही वेळ पुढें जाण्याला फार चांगली आहे. (उघड) हां भिऊं नका, भिऊं नका– (स्वतःशीं) अरे, पण मा राजा आह असें ओळखून त्या बिचकतील. बरें, त्यांना कांहीं तरी सांगतां येईल.

**शकुंतलाः**— ( दोन पावलें जाऊन पाहून ) काय इकडेही आला ?

**राजाः**— ( त्वरेनें जवळ जाऊन ) हां खबरदार, दुर्जनांचा शास्ता पौरव राजा पृथ्वीपालन करीत असतां, कोण रे तो दुष्ट या मुनिकन्येला त्रास देत आहे ?

[ एकाएकीं राजा आला असें पाहून सर्वजणी विस्मय करितात. ]

**अनसूयाः**— महाराज, फारशी वाईट गोष्ट झाली नाहीं. ( शकुंतलेकडे बोट करून ) ही आमची प्रियसखी भ्रमराला भिऊन ओरडली, दुसरें कांहीं नाहीं.

**राजाः**— ( शकुंतलेसमोर येऊन ) कां तुम्ही खुशाल आहांना ?

**शकुंतलाः**— ( भीतीमुळें कांहीं एक न बोलतां खालीं मान घालून उभी राहते. )

**अनसूयाः**— हो, आपल्यासारख्या पाव्हण्यांचें दर्शन झालें म्हणजे आम्ही खुशालच. सखे शकुंतले, पर्णकुटिकेंत जा आणि फलमिश्रित अर्घ्य घेऊन ये. पाय धुवायला पाणी ह्या घागरींत आहेच.

**राजाः**— तुमच्या या गोडगोड भाषणानेंच माझें आतिथ्य झालें. दुसरे उपचार नकोत.

**प्रियंवदाः**— महाराज, आपण फार श्रमलांतसे दिसतां. तर या सातवणीच्या वृक्षाखालच्या ओट्यावर दाट छाया आहे, तेथें बसून घटकाभर विश्रांति तरी घ्यावी.

**राजाः**— तुम्हींही या पाणी घालण्याच्या कामानें दमलेल्याच आहां.

**अनसूयाः**— सखे शकुंतले, या पाव्हण्यांच्या मर्जीप्रमाणें आह्मांला वागलें पाहिजे. चल ये तर, बसूं या. ( सर्वजण बसतात. )

**शकुंतलाः**— ( आपल्याशीं ) देवा, काय बरें चमत्कार ! या पुरुषाला पाहिल्यापासून तपोवनांत न होणारे विकार माझ्या मनांत उत्पन्न होतात !

**प्रियंवदाः**— ( अनसूयेच्या कानांत ) अनसूये, मोठा चतुर, भारदस्त, गोड बोलणारा, आणखी पराक्रमी हा कोण असेल बरें ?

**अनसूयाः**— सखे, मलाही हीच उत्कंठा आहे. विचारतेंच यांना. ( उघड, राजाकडे मुख करून ) महाराज, आपल्याशीं आम्हीं मुलींनीं भाषण केलें तरी आपण रागावणार नाहीं, असें या मधुर भाषणावरून

समजलें; म्हणून विचारायला धैर्य येऊन कांहीं विचारावेंसें वाटतें तर विचारूं का ?

**राजा**:— हो हो, खुशाल विचारा.

**अनसूया**:— आपण उत्पन्न होऊन कोणत्या राजाचा वंश शोभविला ? आपण इकडे आल्यानें कोणत्या देशांतले लोक आपल्या वियोगदुःखानें झुरत आहेत ? आणखी या सुकुमार देहाला या तपोवनांत येण्याची पीडा कशाकरितां दिली ?

**शकुंतला**:— मेल्या वेड्या मना, व्यर्थ तळमळूं नको ! तुला जें पाहिजे होतें तेंच अनसूयेनें विचारलें.

**राजा**:— (आपल्याशीं) आतां खरें नांव सांगावें तरी कसें, आणखी लपवावें तरी कसें ? बरें, असें सांगावें. मुलींची समजूत घालण्याचें काय जड आहे ? ( उघड ) बाई, ज्याला पौरव राजानें धर्माधिकारावर नेमला तो मी, येथल्या तुमच्या क्रिया निर्विघ्न चालल्या आहेत कीं नाहीं हें पाहण्यासाठीं येथें आलों आहें.

**अनसूया**:— तर मग आपल्या ह्या आगमनानें आम्ही सनाथ झालों.

**शकुंतला**:— ( शृंगारलज्जा दाखविते. )

**दोघी सख्या**:— ( राजाचा डोळा व शकुंतलेचा चेष्टा पाहून शकुंतलेच्या कानांत ) आज काश्यपबाबा घरीं असते तर फार चांगलें झालें असतें.

**शकुंतला**:— ( रागावून ) असते तर काय झालें असतें ?

**दोघी०**:— आपल्या जिवाहून आवडती अशी वस्तु या पाव्हण्यांना देऊन त्यांना सुखी केलें असतें.

**शकुंतला**:— ( कपाळास आंठ्या घालून ) तुम्हीं दोघी जणी हवें तें बडबडा, तुमचें बोलणें मी ऐकायचीच नाहीं.

**राजा**:— मलाही या तुमच्या सखीविषयीं कांहीं विचारावयाचें आहे.

**अनसूया**:— महाराज, खुशाल विचारा; आमच्यावर हा अनुग्रहच आहे.

**राजाः—** भगवान् काश्यपऋषि हे नैष्ठिक ब्रह्मचारी आहेत असें ऐकतों. आणखी ही तुमची सखी त्यांची कन्या, हें कसें ?

**अनसूयाः–** ऐकावें महाराज, विश्वामित्र म्हणून कोणी मोठा राजर्षि आहे.

**राजाः—** होय, ऐकण्यांत आहे.

**अनसूयाः–** तो आमच्या सखीचा जनक होय. त्यानें लहानपणींच इला टाकिली. तेव्हां हिचें संगोपन कण्वबाबांनीं केलें, म्हणून त्यांनाच इचे पिते असें म्हणतात.

**राजाः—** " त्यांनीं इला टाकिली " हे शब्द ऐकून फारच चमत्कार वाटतो, तर इची सर्व कथा सांगा.

**अनसूयाः**- ऐकाः– तो विश्वामित्र राजर्षि पूर्वी गौतमी नदीच्या तीरीं मोठी उग्र तपश्चर्या करीत बसला असतां देवांना भय उत्पन्न होऊन त्यांनीं त्याच्या तपाचा भंग करण्याकरितां नियमाची केवळ विघ्नदेवताच अशी मेनका नांवाची अप्सरा पाठविली.

**राजाः–** दुसऱ्याची तपश्चर्या पाहून भिण्याची खोड देवांना आहेच. बरें, पुढें ?

**अनसूयाः—** ती जेव्हां तेथें आली त्या वेळेस वसंतऋतु होता; तशांत तिचें तें उन्माद देणारें रूप पाहून—( असें अर्धेंच बोलून लाजून खालीं मान घालते. )

**राजाः—** पुढचें सांगायाला नको; एकूण ही अप्सरेची कन्या ?

**अनसूयाः—** होय.

**राजाः—**ठीकच आहे.

**दिंडी**– राग लीलांबरी, ताल दादरा.

**कसें निपजे मनुजांत रूप ऐसें ॥**
**असाधारण या जगीं होय कैसें ॥**
**जन्म घेते ती वीज महाऽकाशीं ॥**
**तसें नाहीं सामर्थ्य भूमिपाशीं ॥**

**शकुंतला:**— ( खालीं मान घालून बसते. )

**राजा:**— ( आपल्याशीं ) माझे मनोरथ पूर्ण होतील असें वाटतें; परंतु इच्या सख्यांनीं थट्टेंत लग्नाची गोष्ट काढिली त्या वेळेस इनें झिट-कारल्याप्रमाणें केलें; तेवढ्यावरून मात्र थोडासा संशय उत्पन्न होतो.

**प्रियंवदा:**— ( हंसत शकुंतलेकडे पाहून राजास ) महाराज पुनः आपल्या मनांतून कांहीं बोलायचें आहे असें दिसतें.

**शकुंतला:**— ( प्रियंवदेस बोटानें दावते. )

**राजा:**— बाई, तूं चांगलें ओळखलेंस! थोरांचें चरित्र किती ऐकलें तरी पुरें होत नाहीं. याकरितां तुमच्या सखीविषयीं आणखी कांहीं विचारायचें आहे,—

साकी—राग जोगी, ताल धुमाळी.

**लग्न होइपर्यंत सखीनें कां मौनव्रत धरिलें ॥**
**अथवा मृगिसहवासें इजला भाषणगुण नच आहे ॥**
**बोलत कां नाहीं। टकमक टकमक बघते ही ॥**

**प्रियंवदा:**— महाराज, धर्माचरण करण्याविषयीं देखील आम्हीं परतंत्र आहोंत, एवढ्यावरूनच आपण निराश होऊं नये. इच्यायोग्य चांगला एखादा वर पाहून त्याला ही द्यावयाची, असा इच्या बापाचा संकल्प आहे, यांत काय तें समजून घ्या.

**राजा:**— ( आपल्याशीं ) तर इच्या बापाची अनुज्ञा मिळविणें कांहीं कठिण नाहीं. ( आनंदानें. )

पद—राग गौरी, ताल धुमाळी.

चाल—शारदे दास कामदे.

**हे मना। सोड कल्पना। पूर्ण कामना। खरोखर झाली।**
**अभिलाष धरीं पूर्विंची कुशंका फिटली॥ लखलखी।**
**बघुनि सारखी। होसि विन्मुखी। म्हणसि ज्या अग्नी ॥**
**तो वन्हि नव्हे तर रत्न होइ संलग्नी ॥ घे करी। वाहिजे**
**शिरीं। वाळगें उरीं। माळ हिरकणिची॥ तुज जोड**
**मिळाली आज बहुत पुण्याची ॥**

**शकुंतलाः—** ( रागावली असें दाखवून ) अनसूये, जातें बाई मी.

**अनसूयाः—** हें काय, जातेस कुठें ?

**शकुंतलाः—** ही पहा प्रियंवदा मघांपासून हवें तें भलतें भलतें बोलते आहे. हें सगळें जाऊन मी गौतमी आत्याबाईला सांगतें.

**अनसूयाः—** अग, या पाव्हण्यांचा आमच्या हातून कांहींच सत्कार घडला नाहीं, आणखी त्यांना येथें एकटेंच टाकून स्वच्छंदपणानें निघून जाणें हें तुला चांगलें नव्हे.

**शकुंतलाः—** ( कांहीं एक उत्तर न देतां चालू लागते. )

**राजाः–** (तिला धरूं गेल्याचा आविर्भाव दाखवून आपल्याशीं) अरे कामिजनांच्या मनोवृत्ति त्या त्या चेष्टांचा भास उत्पन्न करितात. पहा माझी कशी अवस्था झाली तीः—

**अंजनीगीत**—राग झिंजोटी, ताल धुमाळी.

**मुनितनयेच्या मागूनि गेलों । परि नीतिला भिउनि परतलों ॥ स्थान न सुटतां गेलों आलों ॥ चेष्टा बुद्धीच्या ॥**

**प्रियंवदाः—**( शकुंतलेचा हात धरून ) सखे, जाणें तुला योग्य नाहीं.

**शकुंतलाः—**( भिंवया चढवून ) कां बरें ?

**प्रियंवदाः—**हं; कां बरें ? तुझ्या पाणी घालण्याच्या दोन पाळ्या मीं केल्या आहेत. त्या ऋणांतून आपल्याला सोडीव आणखी जा मग हवी तिकडे. चालली !

[ तिला बळेंच मागें फिरवून आणते. ]

**राजाः—**अहो, झाडाला पाणी घालण्याच्या श्रमानें ही आधींच दमून गेली आहे. पहा,—

**पद**—राग पिलु, ताल धुमाळी.

**चाल—**उद्धवा शांतवन कर जा.

**बायांनो द्या सोडोनि थकली ही पाणि आणोनी ॥**
**घटभारें स्कंध गळाले कोमल कर लालचि झाले ॥**

**श्वासानें उर थरथरलें, अद्यापी किति तरि हाले ॥**
**घामानें मुख डवडवलें, कर्णावरि ओघळ आले ॥**
**॥ चाल ॥ गडबडिनें धांवत येतां । विखुरले केश सांवरितां ।**
**वरचेवर फिरवी हातां । ऐशामधिं सुटली वेणी ॥ बा ० ॥**

तर मी इला तुमच्या ऋणांतून सोडवितों. ही घ्या आंगठी.

**दोघी:**— ( अंगठीवरील अक्षरें वाचून एकमेकींकडे आश्चर्यानें पहातात. )

**राजा:**— मजविषयीं भलतीच शंका घेऊं नका. ही आंगठी राजापासून मला मिळाली आहे.

**प्रियंवदा:**— तर मग ही आंगठी आपल्या हातांतच असावी. आपल्या वचनानेंच ही आमच्या ऋणांतून मुक्त झाली. ( किंचित् हंसून ) सखे शकुंतले, तुजवर प्रीति करणारे हे श्रेष्ठ अथवा महाराज यांनीं तुला सोडविली, तर आतां हवी तिकडे जा.

**शकुंतला:**—( मनांत ) मी उद्दंड जाईन म्हणतें पण माझे पाय कोठें माझ्या स्वाधीन आहेत. ( उघड ) मला रहा किंवा जा म्हणून सांगणारी तूं ग कोण ?

**राजा:**—( शकुंतलेस पाहून आपल्याशीं ) काय बरें, असेल हें ? जशी माझी प्रीति इच्यावर जडली तशी इचीही माझ्यावर असेल काय ? अथवा संशय नको; माझे मनोरथ खचित पूर्ण होतील. कारण,—

**पद**– राग झिंजोटी, ताल त्रिताल.

**मजवरती खचित आहे या स्त्रीचें प्रेम तें ॥**
**बोलेना परि लोभें मम वाणी ऐकते ॥**
**राहेना पुढें माझ्या परि लपुनी पाहते ॥**
**मजवीणें विषय नाहीं इच्या या दृष्टितें ॥**

( पडद्यांत शब्द होतो. )

अहो, अहो तपस्वीजनहो ! आपल्या श्वापदांचें चांगलें रक्षण करा; कारण दुष्यंत राजा शिकार करीत अगदीं जवळ आला आहे.

**ओंवी**–राग मल्हार.

**अश्व चालतां उसळे धुळी ॥ दिसे जैशी शलभांची टोळी ।**
**वृक्षशाखासंलग्न वल्कलीं । पडत आहे पहा हो ॥ १ ॥**
**रथा भिऊनी रानहत्ती । पळत सुटला आली मस्ती ॥**
**चंड झाडांशी करित कुस्ती ॥ धर्मारण्यीं प्रवेश करी ॥ २ ॥**

( सर्व ऐकून घाबरतात. )

**राजाः**— ( आपल्याशीं ) धिक्कार असो माझ्या लोकांना! मला हुडकीत येऊन तपोवनाला त्रास देतात काय ? बरें, बंदोबस्त करितां येईल.

**प्रियंवदाः**— महाराज, हें ऐकून आम्हांला फार भय वाटतें. तर पर्णकुटिकेकडे जाण्याला आम्हांला आज्ञा असावी.

**राजाः**— ( गडबडीनें ) चला तुम्ही. मी तिकडे गेल्यावर आश्रमाला पीडा होणार नाहीं असा बंदोबस्त करवीन. ( सर्व उठतात. )

**अनसूयाः**— महाराज, आमच्याकडून आपला व्हावा तसा सत्कार झाला नाहीं, याकरितां पुनः आपण भेट द्यावी असें म्हणायला आम्हांला लाज वाटते.

**राजाः**— छे छे, असें मनांत देखील आणूं नका. तुमच्या दर्शनानेंच मी कृतार्थ झालों.

**शकुंतलाः**—

**पद***—राग पिलु, ताल धुमाळी.

**सखये अनसूये थांबकि बाई ॥ येतें मी अशि कां घाई ॥**
**रुतला दर्भांकुर माझ्या पाईं ॥ मजला तो दुस्सह होई ॥ साडी**
**कोरांटीस गुंतुन जाई ॥ सोडवितें तोंवरी राहीं ॥**

[ वल्कल सोडवितें असें दाखवून राजाकडे पहात पहात सख्यांसह निघून जाते. ]

* अनसूये, थांब; अम्मळ माझ्या पायांत दर्भाचा कोंब रुतला, आणखी कोऱ्हांटीच्या झाडाला माझ्या वल्कलाचा पदर अडकला; मला तो सोडवूं दे. अशी गडबड कां ? ( सदर अर्थाचें पद कै. देवलकृत आहे. )

**राजाः**—( उसासा टाकून ) नगराला जाण्याविषयीं आतां मला अगदीं उत्साह नाहीं; तर आतां आपले सैनिक आहेत, त्यांसह तपोवनाजवळच कांहीं दिवस राहिलें पाहिजे. काय करूं, शकुंतलेपासून माझें मन परत येत नाहीं! पहा, माझी कशी अवस्था झाली आहे तीः—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**जात पुढें मम शरीर परि मन धांव घेतसे मागें ॥**
**पुढच्या वायूकडेस नेतां ध्वजवस्त्र उडूं लागे ॥**
**तैसी झाली गती ॥ जडली चिंता नव चित्तीं ॥**

[ निघून जातो. ]

[ पहिला अंक समाप्त. ]

---

## अंक २ रा.

( तदनंतर खिन्नमुख विदूषक प्रवेश करितो. )

**विदूषकः**— ( उसासा टाकून ) अरे फुटक्या नशिबा, या राजाच्या नादीं लागून मी अगदीं दमून गेलों !

**कटाव.**

हा इकडे वनवराह उठला ।
तो पहा मृग पळतचि सुटला ।

असें म्हणत, भर उन्हाळ्यांत हा भटकत फिरतो । ऐनदुपारीं छाया नाहीं, ऐशा त्या वनिं पळतचि सुटतो ! तान लागल्या बहु श्रमानें, पडुनी पानें कुजुनि कडूविख जाहलें पाणी गटागटा पीणें । भूक लागल्या लोखंडाच्या दांड्यावरतीं भाजुनि केलें तयार ऐसें मांस घेउनी, भलत्यासलत्या वेळीं मग तें यथेच्छ खाणें । घोडीं धांवति त्यांमागोनी, कांट्यांतूनी, अडवाटेनें माझें तट्टू धांव मारितें । कांटे लागुनि सांधे माझे फाटुनि गेले। रात्रीचीही झोंप मिळेना। पहाटेस थोडीशी गुंगी येते । तों हें रान वेढुनी, आरड करुनी, शक्तिमान बटकीचे हलकट फांसेपारधि मला उठविती । यापरि माझें नशीब लागे हात धुवोनी माझ्या पाठीं। अवाळुवरतीं रक्त नासुनी करट जाहलें । त्यावरतीं हें उठाण उठलें। यापरि माझें नशीव फळलें । जाइल लवकर नगरा ऐशी आशा होती। परि मम दुर्दैवानें येथें धांव घेतली। शकुंतला नामें कुणि ऋषिची कन्या याच्या दृष्टीस पडली । तिला बघुनि वेडावुनि गेला, यानें तर तळ या वनिं दिधला । फळ आतां काय रडोनी । सखा माझा भूप असोनि, वनचर मी जाय बनोनी ॥

काय करावें ! बरें, तो आपला प्रातर्विधि आटपून बसला असेल; तर त्याची भेट तरी घ्यावी. ( इकडे तिकडे फिरून व पाहून ) हा

पहा, माझा मित्र इकडेच येत आहे. बरोबर यवनास्त्रियांचा परिवार आहे; त्यांनीं गळ्यांत वनपुष्पमाला घातल्या आहेत, व हातांत धनुष्यें घेतलीं आहेत. तर आतां आपण हातपाय मोडल्यासारखे उभे राहूं; म्हणजे तेणेंकरून तरी मला विश्रांति मिळेल.

( हातांतील कांठी टेंकून वांकडातिकडा उभा राहतो. )

( तदनंतर वर्णन केल्याप्रमाणें दुष्यंत राजा प्रवेश करितो. )

**राजाः—**

**पद—** राग काफी, ताल दीपचंद.

भोलानाथ दिगंबर या चालीवर.

**साध्य नसे मुनि कन्या ॥ मज ही,**
**परि वेडें मन ऐकत नाहीं ॥ ध्रु० ॥**
**पाहुनि सखिच्या विविध विलासा ॥**
**मन घेई हें बहु विश्वासा ॥**
**स्मर जरि तुष्ट न होई ॥**
**मी परि बहु सुख यांतचि घेई ॥ साध्य० ॥ १ ॥**

एकूण कामीजन आपल्या अभिप्रायानुरूप आपल्या प्रिय मनुष्याचीही चित्तवृत्ति असेल असें कल्पून व्यर्थ आपली विटंबना मात्र करून घेतो. पहा,—

राग काफी, ताल व चाल सदर.

**डोळे मुरडुनि सहज बघे ती ॥**
**ठुमकत मुरडत चाले गजगति ॥**
**चेष्टा केली सखीसी ॥**
**ती मी मजकडे लावुनि घेई ॥ साध्य० ॥ २ ॥**

**विदूषकः—** (तसाच उभा राहून) अरे मित्रा, माझे हात अगदीं आंखडले, मला नमस्कार करितां येत नाहीं; म्हणून शब्दानेंच मी तुझा जयजयकार करितों.

**राजाः—**अरे, तुझे हातपाय असे कशानें आंखडले ?



**विदूषकः—** " हा पहा, माझा मित्र इकडेच येत आहे. बरोबर यवनी स्त्रियांचा परिवार आहे. आपण आतां हातपाय मोडल्यासारखें उभें रहावें. तेणेंकरून विश्रांति तरी मिळेल" [ शाकुंतल अंक २. पृ. २२

**विदूषकः—** शाबास, आपणच एखाद्याच्या डोळ्यांत बोट घालावें, आणि "कां रडतोस" म्हणून आपणच त्याला विचारावें !

**राजाः—** मित्रा, ही अन्योक्ति मला समजली नाहीं; तर तिची चांगली फोड करून सांग.

**विदूषकः—** बरें मित्रा, नदीच्या कडेला जे वेत असतात ते काय आपल्या गुणानें वांकडेतिकडे होतात किंवा नदीच्या वेगानें होतात ?

**राजाः—** नदीच्या वेगानें.

**विदूषकः—**तर मग माझीं अंगें वांकडींतिकडीं होण्याला तूंच कारण आहेस.

**राजाः—** कसा बरें मीच कारण आहें ?

**विदूषकः—** अरे, तूं आपला राज्यकारभार सोडून अशा या भयाण निर्जन वनांत वनचरासारखा हिंडूं लागलास; आणखी दररोज तुझ्या-मागून श्वापदांच्या पाठीस लागून माझ्या अंगाचा सांधा न् सांधा इतका दुखतो आहे, कीं आपले हातपाय आतां बिलकूल आपल्याला उचलवत नाहींत. याकरितां एक दिवस नगरांत जाऊन स्वस्थपणें विश्रांति घ्यायला आज्ञा दे.

**राजाः—**(स्वतःशीं) हा तर असें म्हणतो. माझेंही मन त्या शकुंतले-च्या नादीं लागल्यापासून मृगयेविषयीं कसें विटून गेलें आहे. कारण—

राग काफी, ताल व चाल सदर.

**वांकविण्या धनु बळ मज नाहीं ॥**
**पारध नलगे ऐसें होई ॥**
**जणुं मृगसंगें तिजला ॥**
**मोहक-दर्शन-गुण हा येई ॥ साध्य० ॥ ३ ॥**

**विदूषकः—** ( राजाच्या तोंडाकडे पाहून ) आपलें लक्ष दुसरीकडे जाऊन आपण मनांतल्या मनांत पुटपुटतां आहांसें वाटतें. एकूण मीं जी एवढा वेळ ओरड केली ती अरण्यांत जाऊन रडल्याप्रमाणेंच झाली.

**राजाः**—( सस्मित ) अरे, मित्राचा शब्द कसा मोडावा ह्या विचारांत मी आहें.

**विदूषकः**— ईश्वर तुला चिरायु करो! ( असें म्हणून जाऊं लागतो. )

**राजाः**— मित्रा, जरा थांब, आणि मी म्हणतों तें सर्व ऐकून तर घे.

**विदूषकः**— हा उभा राहिलों; काय आज्ञा आहे ?

**राजाः**— तुला विश्रांति तर देतोंच; पण एका लहानशा कामांत तूं मला साहाय्य केलें पाहिजे.

**विदूषकः**—काय ? कांहीं लड्डुविड्डुंची तयारी आहे वाटतें? हं ! मग तें काम आपलें. ही पहा कंबर बांधलींच !

**राजाः**— काय तें सांगतों, थांब.

**विदूषकः**— हा पहा, मी तयार आहें; सांग पाहूं काय तें ?

**राजाः**— अरे, कोण आहे रे तेथें ?

**दौवारीकः**— ( प्रवेश करून ) जी सरकार, काय हुकूम आहे ?

**राजाः**— रैवतका, सेनापतीस घेऊन ये.

**दौवारीकः**— जी सरकार ! ( असें म्हणून आंत जातो, व सेनापतीसह पुन. प्रवेश करून सेनापतीस )— हे पहा सरकार आज्ञा करण्याविषयीं अगदीं उत्सुक होऊन आपली वाट पहातच्च उभे आहेत, तर चलावें पुढें.

**सेनापतिः**— ( राजाकडे पाहून ) शिकारीला लोक दोष देतात; पण महाराजांना ती एक गुणच झाली. पहा आमचे सरकार कसे दिसतात ते,—

**पद**—राग जंगला जिल्हा, ताल धुमाळी.
नको हरी निशीं बाहेर जाऊं. या चालीवर.

**आकर्षुनि धनु कठिण तनूतें उष्णसहानें बल तें येतें ।**
**व्यायामानें स्थूल न दिसतां वनकरिपरि हे धरिती बला ॥**
**देति शिकारिस दोष परि या भूपतिवरती गुण झाला ॥ १ ॥**

( जवळ येऊन ) जयजयकार महाराज, सर्व रान वेढून तयार आहे, मग उशीर कां ?

**राजा:**— मृगयेविषयीं या माधव्यानें माझें मन अगदीं उदास करून टाकिलें आहे.

**सेनापति:**— ( विदूषकाच्या कानांत ) गड्या, तूं आपला हट्ट सोडूं नकोस. मी अम्मळ यजमानाच्या मनासारखें बोलतों. ( उघड ) महाराज, त्या मूर्खाला काय अक्कल आहे ? तो मनास येईल तसें बडबडतो. शिकारीपासून काय गुण आहेत याला आपणच साक्ष आहांत. पहा महाराज,—

राग जंगला, ताल व चाल सदर.

**मेद झडोनि होय कृशोदर, उठण्या बसण्या श्रम नाहीं ॥**
**चल लक्ष्यावरी नेम साधतो, उत्कर्षाचि हा धन्व्याला ॥**
**देति शिकारिस दोष परि या भूपतिवरतीं गुण झाला ॥ २ ॥**

**विदूषक:**—( रागानें ) जारे, शिकारीचें अवसान भरवणाऱ्या ! चल निघ; हा राजा प्रकृतीनें चांगला आहे; तो कशाही प्रसंगांतून पार होऊन जाईल. तूं मात्र गुलामा, या वनांतून त्या वनांत हिंडतांना, माणसांचीं नाकें खाण्याला संवकलेल्या एखाद्या जुन्या अस्वलाच्या तोंडीं अचूक जाऊन पडशील.

**राजा:**— अहो, सेनाध्यक्ष, आम्ही आश्रमाजवळ आहों, याकरितां तुमची गोष्ट कबूल करितां येत नाहीं. तर आज असें होवो;—

**पद**—राग अरबी, ताल धुमाळी कर्नाटकी.

**शृंगा ताडोनी डोहीं खेळत महिष वनीं ॥ आज ते ॥**
**रंवथ करुत मृग ते तरूच्या सावलींत बसुनी ॥ आज ते ॥**
**सूकरततीं हर्षो नागरमोथा उपटोनी ॥ आजी ॥**
**विश्रांति या धनूला येवो । शिथिल रज्जू करुनी ॥**
**ऐका । आहों पुण्यवनीं ॥ आम्ही० ॥**

**सेनापति:**—( लवून ) जशी महाराजांची आज्ञा !

**राजा:**— तर मग रान वेढण्याला पाठविलेले सर्व लोक मागें आणा. आणि माझ्या सैनिकांपासून तपोवनाला त्रास अगदीं होऊं नये अशी सक्त ताकीद द्या. कारण,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**शमधन दिसती परी गुप्त खर तेज असे ऋषिमाजीं ॥**
**सूर्यकांतमणि वन्हि वमे जरि बल ये दुसऱ्या तेजीं ॥**
**सावध रहावें । मुनिच्या वाटे नच जावें ॥**

**सेनापतिः**— जशी महाराजांची आज्ञा !

**विदूषकः**— जारे बटकीच्या ! तुझी शिकारीची मसलत कशी धुडकावून टाकली !

[ सेनापति जातो. ]

**राजाः**—( यवनींकडे पाहून ) तुम्हींही आपला शिकारीचा पोषाख उतरा, चला. [ यवनी मुजरा करून जातात. ] रैवतका, तूंही आपल्या कामाला जा.

**रैवतकः**— हुकूम. ( निघून जातो. )

**विदूषकः**— आपण तर येथें माशी देखील राहूं दिली नाहीं; तर छताप्रमाणें शोभणाऱ्या या झाडाच्या छायेखालीं चवरंगाप्रमाणें छानदार शिला आहे, इजवर क्षणभर बसा तरी; ह्मणजे मीही अम्मळ पाय लांब करीन.

**राजाः**— चल हो पुढें.

**विदूषकः**-- यावें महाराज. ( दोघे शिळेवर जाऊन बसतात. )

**राजाः**— गड्या, फारच बघण्यालायक अशी वस्तु तूं पाहिली नाहीं, म्हणून तुझ्या डोळ्यांचें कांहीं सार्थक झालें नाहीं. व्यर्थ रे व्यर्थ !

**विदूषकः**— महाराज, आपण तर माझ्या पुढेंच आहां, आणखी दुसरी सुंदर वस्तु ती कोणती ?

**राजाः**— अरे, आपलीं माणसें सर्वांना सुंदरच दिसतात; पण या आश्रमास अलंकारभूत जी शकुंतला तिच्याविषयीं माझें बोलणें आहे.

**विदूषकः**— ( आपल्याशीं ) आतां याला फूस देऊन उपयोग नाहीं. ( उघड ) मित्रा, ती ब्राह्मणकन्या , तुला कांहीं तिजबरोबर लग्न करतां

येणार नाहीं, कांहीं नाहीं; मग ती किती जरी चांगली असली, तरी तुला तिच्याकडे पाहून काय उपयोग ?

**राजाः**— मित्रा, अपात्र वस्तूंवर पौरवराजांचीं मनें कधीं जात नाहींत.

**पद**—राग पिलु, ताल धुमाळी.

**देवस्त्री मेनका अप्सरा तिची ही कन्या ॥**
**बालपणीं इस सोडुनि गेली स्वर्गी ती धन्या ॥**
**कण्वमुनीला मिळे वनीं ही दुर्मिळ जी अन्या ॥**
**पुष्प जसें जाईचें गळालें रुईवरीं कीं वन्या ॥**

**विदूषकः**— ( हंसून ) नेहमीं मिष्टान्न खाणाराची जशी चिंचेवर इच्छा जाते तद्वत् अंतःपुरांतल्या उत्कृष्ट स्त्रियांशीं विलास करणारा जो तूं त्या तुझी ही भलतीच वासना आहे.

**राजाः**— तूं तिला पाहिल्यावर असें कधीं बोलणार नाहींस.

**विदूषकः**— हो हो, तुम्ही जेव्हां इतके भुललां आहांत तेव्हां ती खरोखर तशीच सुंदर असेल.

**राजाः**—सुंदर म्हणून काय विचारतोस !—

**पद**—राग आनंदभैरवी, ताल दिपचंदी ( कर्नाटकी )

**काय परम रमणीय सखीचें रूप कथूं तुजला ॥ ध्रु०**
**ब्रह्मदेव आधिं सुंदर चित्रीं हात वळवी आपुला ॥**
**मग बनवी हें रत्न विलक्षण ऐसें वाटे माझ्या मतिला ॥**
**स्त्रीसृष्टिची नूतन काया ऐशी वाटे हो ती ॥**
**तनूची मूस मनीं ओती ॥ काय परम० ॥**

**विदूषकः**— असें जर आहे, तर ही रूपवती स्त्रियांचा गर्व परिहार करण्यासच उत्पन्न झाली आहे असें म्हटलें पाहिजे.

**राजाः**— मला तर असें वाटतें;—

**पद**—राग आनंदभैरवी, ताल दीपचंदी.

इष्ट दीना भूवैकुंठा, या चालीवर.

**नाहीं कोणींही हुंगीलें ॥ ऐस तें बा पुष्पाचि फुललें ॥**
**नाहिं ज्याला नख लावियलें । ऐसा कोमल पल्लव पाहे ॥**

**नाहिं ज्यावरी घर्षण घडलें । ऐसें मुक्तारत्नचि दिसलें ॥**
**नाहिं ज्याला कुणि चाखीलें । ऐसा अभिनव मधू तो आहे ॥**
**बहु मोठें पुण्यचि फळलें ॥ ऐसें जें वपु जन्मा आलें ॥**
**उपभोगा भाग्यचि दिधलें । कवण्या प्राण्या हेंचि कळेना ॥**

**विदूषकः**— तर मग जलदी कर नाहीं तर डोक्याला हिंगणबेटाचें तेल चोपडलेल्या एखाद्या ऋषीच्या हातांत ती सांपडेल.

**राजाः**— अरे, ती अगदीं पराधीन आहे, तशांत तिचीं वडील माणसेंही जवळ नाहींत.

**विदूषकः**— बरें, तुझ्यावर तिचा प्रीतीचा डोळा तरी कसा काय आहे?

**राजाः**— अरे, तपस्व्याच्या मुली जातीनेंच भोळया असतात, तथापि—

**दिंडी**— राग लीलांबरी, ताल दादरा.

**नेत्र माझा चुकवूनि हळूचि पाहे ॥**
**अन्य मिष तें काढोनी हंसत राहे ॥**
**विनयवतिनें स्मर नाहिं झांकियेला ॥**
**नाहिं किंवा उघडोनि दावियेला ॥**

**विदूषकः**— अरे हें पुष्कळ झालें. तुझ्या मतें तुला पाहतांच तिनें तुझ्या मांडीवर येऊन बसावें होय ?

**राजाः**— जेव्हां ती सख्यांबरोबर निघाली तेव्हां तिनें, सलज्जतेनें कां होईना, पण आपल्या मनांतला भाव अगदीं उघड करून दाखविला. तो असा;—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**रुतला दर्भांकुर चरणीं ॥ म्हणुनी राहे उगिच तरुणी ॥**
**गेली थोडी चालोनी ॥ पाहत मागें मुरडोनी ॥ चाल ॥**
**सोडवितेशी दावी वल्कल वृक्षापासोनी ॥ काय कथूं रे ऐशी**
**तीची विचित्र ती करणी ॥**

**विदूषकः**— तर मग आतां लग्नाच्या मेजवानीची तयारी होऊं द्याच. शाबास फक्कड, आपण तर तपोवनाचें उपवनच करून सोडिलें !

**राजाः—** मित्रा, या तपोवनांतले कित्येक ऋषी मला ओळखतात; तर पुनः त्या आश्रमांत कोणत्या निमित्तानें जावें याची कांहीं युक्ति काढ बरें.

**विदूषकः—** अरे, दुसरी युक्ति कशाला पाहिजे; तूं राजा आहेस कीं नाहीं ?

**राजाः—** मग राजा असलों म्हणून ?

**विदूषकः—** अरे येथें जें देवभात आपोआप पिकतें तें या ऋषींना फुकटच्याफाकट आयतेंच मिळतें; त्याचा सहाव्वा हिस्सा फाळयाबद्दल मागण्याच्या निमित्तानें जावें म्हणजे झालें !

**राजाः—** मूर्खा ! रत्नराशीपेक्षां मौल्यवान् असा कर आम्हां राजे लोकांना या ऋषींपासून मिळत असतो.

पहाः—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**प्रजेपासूनि जें मिळे भूपतीला ॥**
**द्रव्य सारें जाणार नष्टतेला ॥**
**तपश्चर्येचा षष्ठ भाग देती ॥**
**म्हणुनि अविनाशी फलद तेचि होती ॥**

( पडद्यांत—‘ अहा ! ! आम्ही कृतार्थ झालों.’ )

**राजाः—** अरे हा गंभीर आणि शांत असा शब्द कोणाचा येतो आहे ! मला वाटतें कोणी तरी तपस्वी आले आहेत.

( द्वारपाल प्रवेश करितो. )

**द्वारपालः—**( लवून ) जयजयकार महाराज ! दोन ऋषिकुमार आपली गांठ घेण्यासाठीं आले आहेत.

**राजाः—** त्यांना लवकर घेऊन ये.

**पहिला ऋषिकुमारः—**( राजाकडे पाहून ) अहो हा महात्मा तेजः-पुंज असून किती शांत दिसत आहे !

**पद**—राग शंकराभरण, ताल झंपाप्रबंध; नमो भक्त सुरतरुलते. ( देविलळित. )

**मला शांत मुनि भासतो भूप नोहे ॥ पाहुनी प्रेमजल नेत्रिं वाहे ॥ ध्रु० ॥ आक्रमुनि भूमि ही, धर्म पाळोनियां, प्रत्यहीं तपचि हें सांचवीतो ॥ सिद्धचारणमुखें यद्यशा ऐकुनी, स्वर्गीं सुरनाथ तो डुलत राहे ॥ मला० ॥**

**दुसरा ऋषिकुमारः**—गौतमा, इंद्राचा मित्र दुष्यंत तो हाच काय ?

**प० ऋषिकुमारः**— होय, तोच हा दुष्यंत.

**दु० ऋषिकु०ः**— म्हणूनच.–

**पद**—राग शंकराभरण, ताल व चाल सदर.

**काय मग नवल जरी एकला भोगितो ॥ सागरांता मही भूपती हा ॥ असुरसमरांत सुर भरंवसा ठेविती इंद्रवज्रीं तसा धनुषिं याच्या ॥ किती थोर हा, शूर हा सदय साचा ॥ वर्णवेना पहा थकलि वाचा ॥ किती थोर हा० ॥ २ ॥**

**दोघेः**— ( जवळ जाऊन ) राजा, तुझा विजय असो !

**राजाः**—( उठून ) उभयतांना मी नमस्कार करितों.

**दोघेः**— तुझें कल्याण होवो. ( नारळ देतात. )

**राजाः**—( लवून नारळ घेतो. ) कोणची आज्ञा करायची आहे ?

**दोघेः**— आपण येथें आलां आहां हें आश्रमांतल्या कित्येक ऋषींना कळल्यावरून त्यांची कांहीं प्रार्थना आहे.

**राजाः**— त्यांची काय आज्ञा आहे ?

**दोघेः**— सांप्रत कण्वमहर्षि येथें नाहींत, आणि उद्यां तर इष्टीचा दिवस, तेव्हां राक्षसांच्या भयामुळें अशी प्रार्थना आहे कीं, आपण सड्या स्वारीनिशीं कांहीं दिवस येथें राहून आमची इष्टि निर्विघ्न सांग करावी.

**राजाः**— कांहीं चिंता नाहीं. हा मजवर अनुग्रहच समजायचा.

**विदूषकः**—( एकीकडे ) हो, हो, खरोखरच अनुग्रह. कां राजश्री, ही यांची प्रार्थना तुमच्या पथ्यावरच पडली म्हणावयाची !

**राजाः**—( हंसून ) रैवतका, धनुष्यबाणांसहित माझा रथ तयार असूं दे म्हणून सारथ्याला सांग.

**रैवतकः**— जी सरकार. ( निघून जातो. )

**दोघेः**— ( हर्षानें )

**दिंडी**—राग झिलांवरी, ताल दादरा.

**पूर्वजांचा अनुकार तुला साजे ॥**
**पूरुवंशीं जे जन्म घेति राजे ॥**
**शरण आल्यातें दुःख हरायातें ॥**
**त्यांनिं बांधियेलें करीं कंकणातें ॥**

**राजाः**—( हात जोडून ) महाराज आपण पुढें व्हा; मीही आपल्या पाठोपाठ आलोंच.

**दोघेः**—( वर हात करून ) तुझा विजय असो !

( निघून जातात. )

**राजाः**— कां मित्रा, शकुंतलेला पाहण्याची इच्छा असली तर चल माझ्या बरोबर.

**विदूषकः**— मघाशीं जेव्हां तूं तिचें वर्णन केलेंस, तेव्हां तिला केव्हां पाहीन असें झालें होतें; पण हें राक्षसांचें वर्तमान ऐकल्यापासून तिकडे तोंड देखील करूं नयेसें वाटतें. नकोरे बाबा तें शकुंतलेला पाहणें. धडपणीं मला नगराला जाऊं दे कसा.

**राजाः**— अरे, असा भितोस कां ? मी आहेंना तुझ्याजवळ !

**विदूषकः**— तर मग मुळींच भ्यायचा नाहीं, तुझा मी चक्ररक्षकं होईन.

( द्वारपाल येतो. )

**द्वारपालः**— रथ तयार आहे महाराज, सरकारचा निघण्याचाच अवकाश आहे. नगराहून आईसाहेबांकडून करभक सांडणीस्वार आला आहे.

**राजाः**— ( आदरानें )— काय, आईसाहेबांकडून आला आहे म्हणतोस ?

**द्वारपालः**— होय सरकार.

**राजाः**— बरें तर त्याला इकडे घेऊन ये.

**द्वारपालः**—( लवून ) हुकूम. ( आंत जाऊन करभकासह प्रवेश करून ) हे महाराज बसले आहेत, चल हो पुढें.

**करभकः**—( मुजरा करून ) महाराज, आईसाहेबांचा असा निरोप आहे कीं, आजपासून चवथ्या दिवशीं पुत्रपिंडपालन म्हणून आईसाहेब व्रत करणार आहेत, त्या दिवशीं सरकारांनीं आईसाहेबांजवळ असलें पाहिजे.

**राजाः**— इकडे तपस्व्यांचें काम, तिकडे आईची आज्ञा. दोन्हीही मोडून उपयोग नाहीं. आतां काय करावें ?

**विदूषकः**— त्रिशंकु राजासारखा मध्येंच लोंबत रहा.

**राजाः**—( चिंतेनें ) खरोखर मोठी पंचाईत आली.

**ओंवी**—राग मल्हार.

**दोन जागीं कामें आलीं ॥ मनोवृत्ति द्विधा झाली ॥**
**नदी जैशी अपटोनि शैलीं ॥ दोन दिशेनें वाहते ॥**

( चिंतन करून ) मित्रा, तुलाही आईनें आपल्या पुत्राप्रमाणें मानलें आहे, तर तूं नगरांत जाऊन मी येथें ऋषींच्या कामांत गुंतलों आहें हें आईसाहेबांस कळवून, मी जवळ राहून जें करावयाचें तें तूंच कर म्हणजे झालें.

**विदू०ः**—मित्रा, मी राक्षसांला भिणारा म्हणून मला एकट्यालाच नगराला पाठवितोस होय ?

**राजाः**— ( हंसून ) छे, छे; तुम्ही केवढे शूर, तुम्हांला भित्रे म्हणतो कोण !

**विदू०:**— तर मग, राजाचा भाऊ जसा डौलानें जातो तसा मी जाईन; त्या माझ्या पहिल्या तट्टावर बसून नाहीं जायचा.

**राजाः**—तपोवनाला पीडा होऊं नये म्हणून सगळें सैन्यच तुझ्या-बरोबर पाठवावयाचें आहे, मग हव्या त्या डौलानें जा.

**विदू०:**— ( आपल्या पाठीवर आपणच हात थोपटून ) शाबास, मी आज युवराज झालों.

**राजाः**— ( आपल्याशीं ) हा गृहस्थ फार लबाड आहे. मी इकडे शंकुतलेच्या नादीं लागल्याचें कदाचित् हा अंतःपुरांतही बोलेल. बरें, याला असें सांगूं. ( विदूषकाचा हात धरून, उघड ) मित्रा, मी जो येथें कांहीं दिवस रहाणार आहें तो केवळ ऋषींच्या कामासाठीं हो. शकुं-तलेची इच्छा मला तिलमात्र नाहीं बरें. पहा,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**कोठें आम्ही कोठें ती स्मरविमुखा पशुसम ऋषिजा ॥**
**वदलों थट्टेनें तें सारें खरें न मानीं, घरिं जा ॥**
**मागुनि मी येतों ॥ सरतां काम न इथें राहतों ॥**

**विदूषकः**—ठीक आहे.

[ सर्व निघून जातात. ]

**( दुसरा अंक समाप्त. )**

## अंक ३ रा.

( तदनंतर हातांत दर्भ घेतलेला एक शिष्य येतो. )

**शिष्यः**—अहाहा ! किती तरी पराक्रमी तो दुष्यंत राजा ! त्यानें या आमच्या आश्रमांत पाय मात्र टाकला, तोंच आमच्या होमहवनाला येणारीं विघ्नें नाहींशीं झालीं.

**ओंवी**—राग मल्हार.

**नाहीं बाणाची गरज पडली ॥ प्रत्यंचा ओढोनि झाडली ॥**
**त्या शब्देंचि विघ्नें टळलीं ॥ महानुभाव दुष्यंत ॥**

बरें, आतां वेदीवर हंतरण्याकारितां हे दर्भ आणले आहेत ते ऋत्विजांना नेऊन देतों. ( इकडे तिकडे फिरून, वर पाहून ) कायग प्रियंवदे, ही वाळयाची उटी आणि देठांसकट कमळांचीं पानें कोणासाठीं घेऊन चालली आहेस ? ( ऐकल्यासारखें करून ) काय म्हणतेस ? उन्हाच्या बाधेनें शकुंतलेची प्रकृति भारी बिघडली आहे म्हणून तिचा दाह शांत करण्याकरतां काय ? तर मग तिच्या औषधपाण्याची व्यवस्था नीट ठेवा बरें—ती कण्वगुरुजींचा केवळ प्राणच आहे— मी देखील आतां जातों, आणखी तिच्यासाठीं गौतमी आतेच्या हातीं यज्ञांतलें तीर्थ पाठवून देतों.

( निघून जातो. )

( नंतर मदनानें पिडलेला राजा प्रवेश करितो. )

**राजाः**—( चिंतायुक्त सुस्कारा टाकून )

**पद**—राग पिलू, ताल धुमाळी.

**ठाउक मजला असे ऋषींचें उग्र तपोबल तें ॥ अधिकाराचा जोर न चाले तेणें हें कळतें ॥ परवशता किती असे तिची हें पूर्ण मला दिसतें ॥ सर्व कळे परि हृदयीं लागली हुरहुर नच**

**जाते ॥ खोल जागीं गेलेलें जल तें वर नच कधिं चढतें॥ तसें प्रियेनें हरिलें तें मन मागें नच फिरतें ॥**

हे भगवंता कुसुमायुधा, तुझ्यावर आणखी या चंद्रावर आम्ही कामीजन भरवंसा ठेवून अगदीं फसतों.

**पद**—राग कलंगडा, ताल दादरा.

**मदना, चंद्रा ! सुवैरी तुह्मी जाहलां ॥ ध्रु० ॥ कुसुमित तव शर शीतहि शशिकर ॥ दुःखचि देति मला ॥ अरेरे दुःख ० ॥ मदना० ॥ १ ॥ वर्षत वन्ही शशि निज किरणीं ॥ तव शर पवि बनला ॥ खरारे ॥ तव० ॥ मदना० ॥ २ ॥**

काय करावें ?—कामदेवाला माझ्याविषयीं अजून करुणा येत नाहीं. अरे, तुझे बाण कोमल फुलांचे असून, ते इतके तीक्ष्ण कशानें बरें झाले ? ( अंमळ थांबून ) हो समजलों:—

राग व ताल सदर.

**हरनेत्रानल जागतसे कां ॥ सागरिं और्वानला। परी कां ॥साग०॥ मदना चंद्रा सुवैरि० ॥ ३ ॥ भस्मरूप तूं असुनि म्हणोनचि ॥ भाजिशि या तनुला ॥ उगेच कां ॥ भाजिशि०॥ मदना चंद्रा०॥४॥**

अथवा त्यानें तरी माझें काय वाईट केलें ?

राग व ताल सदर.

**छळिशी जरि त्या सुंदरिसाठीं ॥ मानिन प्रिय तूजला ॥ सद्गो- दित मानिन० ॥ मदना ० ॥ ५ ॥**

नाहीं नाहीं—मी त्याला इतकें लावून बोलतों, तरी त्याला नाहीं दया येत;—

राग ताल व सदर.

**बहु संकल्पें तुज वाढविलें ॥ मारिसी काय मला ॥ कठोरा मारिसि ० ॥ मदना ० ॥ ६ ॥**

( खिन्न होऊन इकडे तिकडे फिरून )

बरें, ज्या कामासाठीं मला या आश्रमांत ऋषींनीं ठेवून घेतलें तें तर

आटपलें; आणि त्यांनीं मला जावयाला निरोपही दिला. आपण तर फार थकलों आहों. घटकाभर जिवाला कर्मणूक पाहिजे; पण कोठें बरें जावें ? ( सुस्कारा टाकून ) आणखी दुसरीकडे कोठें जायचें ? त्या माझ्या प्रियेला पाहिल्यावांचून समाधान वाटावयाचें नाहीं—तर चला तिकडेच जाऊं. ती कोठें आहे याचा शोध तरी करूं. (सूर्याकडे पाहून) अशा या कडक उन्हाच्या वेळीं ती बहुतकरून आपल्या सख्यांसह मालिनी नदीच्या तीरीं वेलींच्या सावलींत बसत असते; तर तिकडेच जावें. ( इकडे तिकडे हिंडून, पाहून ) अरे ती माझी प्रियतमा या दोन्ही बाजूंनीं फुलझाडें लावलेल्या वाटेनें नुकतीच गेली असावी. कारण,–

अंजनीगीत—राग झिंजोटी, ताल धुमाळी.

**मार्गीं जातां पुष्पें तोडिति ॥ अजुनि तयांचे कोश न मिटती ॥**
**कोमल पल्लव जे त्या खुडिति ॥ चीक गळे तेथें ॥ १ ॥**

( स्पर्श झाल्यासारखें दाखवून ) अहाहा ! इकडे मजेदार वारा असल्यानें हा प्रांत किती रम्य वाटत आहे !

राग व ताल सदर.

**मालिनिकणवाही हा वारा ॥ कमलगंधयुत वाहे भरारा ॥**
**मदनतप्त माझ्या या शरिरा ॥ फारचि सुखवीतो ॥ २ ॥**

( इकडे तिकडे हिंडून व पाहून ) हा इकडे वेतांच्या काठ्यांनीं केलेला लतामंडप दिसत आहे, त्यांत ती बसली असेल. ( खालीं पाहून ) हो येथें असेलच. हें पहा,—

राग व ताल सदर.

**पुढच्या अंगीं वरति उचलली ॥ नितंबभारें खोलचि गेली ॥**
**पदपंक्ती ही येथ उमटली ॥ वाळूवरी दिसते ॥ ३ ॥**

बरें, या फांदीच्या आड लपून पाहूं. ( तसें करून आनंदानें ) वाहवा ! माझ्या डोळ्यांचें सार्थक झालें. ही पहा माझी प्रियतमा फुलांनीं आच्छादलेल्या शिलेवर निजली आहे, तिच्या सख्याही जवळ बसल्या

आहेत. ठीक आहे, आतां मन मोकळें करून या आपापल्यांत काय काय बोलतात तें ऐकूं. ( पहात उभा राहतो )

[ तदनंतर कुसुमशयनावर निजलेली शकुंतला सख्यांसह प्रवेश करिते. ]

**अनसूयाः**— ( वारा घालून ) गडे, या कमलाच्या पानानें आम्ही वारा घालतों आहों, त्यानें तुला अम्मळ बरें वाटतें का ?

**शकुंतलाः**— काय म्हटलेंत ? मला तुम्ही वारा का घालतां आहां ?

( अनसूया व प्रियंवदा एकमेकींकडे खिन्न होऊन पाहतात. )

**राजाः**— हिची प्रकृति तर फारच बिघडल्यासारखी दिसते; पण का या उन्हामुळें असेल, का माझ्या मनांत आहे तसेंच खरोखर असेल बरें ? ( रेखून पाहून ) पण संशय नकोचः—

**पद**—मालकंस, ताल त्रिवट.

**लाविली थंड उटी वाळ्याची सखिच्या कुचकलशां ती ॥ कमलसुतंतु करीं करिं कंकण बांधित परि शोभे ती । मदन निदाघ जनीं संचरुनी ताप समानचि देती ॥ युवतिस तपवि निदाघ जरी तो सुंदर कांति नुरे ती ॥ १ ॥**

**प्रियंवदाः**— (अनसूयेच्या कानांत ) अनसूये, हें बघ त्या दिवशीं तो राजा आला होता कीं नाहीं त्याला पाहिल्यापासून हिची वृत्ति कशी अस्वस्थ झाल्यासारखी दिसते. मग काय बाई हिचें मन त्याच्यावर गेलें आहे कीं काय कळत नाहीं.

**अनसूयाः**— खरेंच गडे माझ्या मनांत सुद्धां अशीच शंका आहे, तर पहातेंच इला विचारून. ( मोठ्यानें शकुंतलेस ) गडे, तुला कांहीं विचारावयाचें आहे, तुला तर बाई अगदींच चैन नाहींसें झालें आहे.

**शकुंतलाः**— ( अम्मळ वरतीं उठून ) काय बाई तुझ्या मनांत विचारायचें ?

**अनसूयाः**— गडे शकुंतले, ती मदनबाधा कीं काय म्हणतात कीं नाहीं तिच्यापासून काय होतें तें कांहीं मला ठाऊक नाहीं; पण कथापुराणांतल्या असल्या गोष्टी आम्हीं ऐकल्या आहेत, तशी बाई तुझी अव-

स्था झाल्यासारखी दिसते. तर गडे सांग तुला काय होतें तें. रोगाची परीक्षा चांगली झाली नाहीं, तर औषध तरी कसलें द्यावें ?

**राजा:**— हिचा व माझा तर्क अगदीं जुळतो.

**शकुंतला:**— ( आपल्याशीं ) माझें मन तर अगदींच त्याच्यावर गेलें आहे; पण माझ्याच्यानें नाहीं यांना सांगवत.

**प्रियंवदा:**— हो गडे, अनसूया ठीक बोलली, आपलें दुःख मनांतल्यां मनांत कां ठेवतेस ? हें पाहिलेंस, रोजच्या रोज तुझ्या हातापायांच्या कशा काड्या होत चालल्या. नुसती लावण्याची टवटवी मात्र काय ती राहिली आहे.

**राजा:**— प्रियंवदा अगदीं खरें बोलली.

पद—राग देस, ताल धुमाळी.

**किती गेले सुकोनी गाल वदन ऊर ईचे**
**त्यजिती कठिणपण कुच तें पूर्वीचें ॥**
**अति कृश कटि झाली स्कंध गळाले साचे ॥**
**अंगीं पसरली पांडुरता सखिचे ॥**
**मज कळकळ येते हाल बघुनि रमणीचे ॥**
**मदनें व्यथित तनु बघणें सौख्याचें ॥**
**जसें गळतां पानें दर्शन मालतिचें ॥**
**शिवती जिला कर ऋतु वसंताचे ॥**

**शकुंतला:**— अग,तुम्हांला सोडून दुसऱ्या कोणाला सांगायचें आहे? पण किं नाहीं, सांगितल्यानें तुम्हांला विनाकारण दुःख मात्र होईल.

**अनसूया:**— अग, म्हणूनच सांगितलें पाहिजे. तुला नाहीं का ठाऊक ? आपलें दुःख आपल्या मैत्रिणींना सांगितलें ह्मणजे हलकें होतें.

**राजा:**—

पद—राग बहार, ताल धुमाळी.

**आतां शशिमुखिच्या विकथनिं मज भय वाटतें ॥ आतां०॥ध्रु०॥ प्रश्न करीति सख्या इस परि ही न वदत हृद्गत चिंता ॥ नेत्र गरागर फिरवुनि लोभें पाहतसे गुणवंता ॥ आतां० ॥ १ ॥**

**शकुंतलाः**— गडे, सांगूंच आतां ? त्या दिवशीं तो तपोवनाचें रक्षण करणारा रा—रा— ( लाजून थांबते. )

**प्रियंवदाः**— अग, लाजूं नको. सांग पुढें.

**शकुंतलाः**— त्याला मीं पाहिलें आणि तेव्हांपासून त्याच्यावर माझें मन जाऊन माझी बाई अशी स्थिति झाली.

**राजाः**— अहाहा ! जें मला ऐकायचें होतें तेंच ऐकलें.

पद— राग सोहोनी, ताल त्रिताल.

**झाली सफल हि मम मनकामना ॥ ध्रु० ॥**
**स्मर तापवि बहु परि तो आतां ॥**
**सुखवित किति तरि या मना ॥ झाली ॥ १ ॥**
**उष्ण दिनांतीं मेघाच्छादित ॥**
**दीन करी सुखयुत तो जना ॥ झाली ॥ २ ॥**

**शकुंतलाः**— सख्यांनो !

पद—राग पिलु, ताल धुमाळी.
उद्धवा शांतवन कर जा, या चालीवर.

**मर्यादा सोडुनि वदणें योग्य न, हें मजला ठावें ॥ परि धीर मनीं धरवेना, हें दुःख किती सोसावें ॥ ज्या प्रेम निरंतर करिती, हितगुजही त्यां सांगावें ॥ आणुनि त्या राजेंद्राला । भेटवाचि सत्वर मजला । त्यावांचुनि शेवट झाला । या साखिचा मनिं समजावें ॥ जरि ममता मजवर तुमची प्रिय माझें होंचि करावें ॥ १ ॥ ***

**राजाः**— या भाषणावरून तर संशय मुळींच फिटला.

**प्रियंवदाः**— ( अनसूयेच्या कानांत ) अनसूये, हा पल्ला बाई फार दूरवर जाऊन पोंचला आहे. आतां कालगत करून उपयोग नाहीं. इचें मन ज्याच्यावर जडलें आहे तो पौरवकुलांतला मुकुटमणि आहे, तेव्हां ही गोष्ट मोठ्या आनंदाचीच समजली पाहिजे.

---

* तुम्हांला आवडत असेल, तर त्या राजर्षीची आणखी माझी भेट करवा; नाहीं तर सोडा माझ्या जिवाची आशा ! ( सदर पद के. देवलकृत आहे. )

**अनसूयाः**— हो खरेंच.

**प्रियंवदाः**— ( मोठ्यानें ) गडे, हिचें मन त्याच्यावर गेलें हें ठीकच आहे. महानदी समुद्रालाच जाऊन मिळायची; पालवीनें भरलेली मोतियाची वेल आंब्याच्या झाडावर चढली तरच शोभते.

**राजाः**— ठीकच, विशाखाचीं दोन नक्षत्रें चंद्राला अनुसरून राहिलीं तर यांत नवल तें काय ?

**अनसूयाः**— तें सारें खरें; पण बाई इचा हेतु तडीस जायला युक्ति कोणची काढावी ? काम तर फार लवकर आणि गुप्तपणें व्हायला पाहिजे.

**प्रियंवदाः**— गुप्तपणानें कसें होतें तेवढ्याची मात्र काळजी आहे. लवकर म्हणशील तर माझ्याकडे लागलें.

**अनसूयाः**— तें कसें काय ? मी नाहीं गडे समजलें.

**प्रियंवदाः**— अग, तो राजा देखील किं नाहीं आतांशा झुरणीला लागल्यासारखा दिसतो. तेव्हां त्याचें मन हिच्यावर गेलें आहेसें वाटतें.

**राजाः**— ( आपल्याकड पाहून ) खरें, ही म्हणते तसा मी झालों आहें खरा.—

**पद**—राग झिंजोटी, ताल त्रिवट.

**झाली खचिताचि मम ही दशा ॥**
**विरहित मतिला छळित निशा ॥ झा० ॥ ध्रु० ॥**
**निजतां घेउनि हात उशाशीं ॥**
**हृत्तापें ये जल नयनांशीं ॥**
**पडुनि बिघडवी कंकणमणिशीं ॥**
**होई किति तरि तनु हि कृशा ॥ झाली ॥ १ ॥**

**प्रियंवदाः**— ( विचार करून ) गडे, मला एक युक्ति सुचली आहे. शकुंतलेनें त्याच्या नांवानें एक प्रीतिपत्र ल्याहावें. तें प्रसादाच्या निमित्तानें निर्माल्यांत लपवून मी त्याला पोंचतें करतें म्हणजे झालें.

**अनसूया:—** हो गडे, ही युक्ति मला रुचली; पण शकुंतलेचें यावर कसें काय म्हणणें आहे ?

**शकुंतला:—** तुमच्या युक्तीवर देखील का शंका काढावयाची ?

**प्रियंवदा:—** तर मग तुझ्या मनांत जसें आहे तशा मजकुराचें एक गीत कर. त्यांतील शब्द कसे गोड असावेत.

**शकुंतला:—** तें सारें मी करीन; पण बाई त्यांना रागबीग आला आणि तिकडे लक्षच दिलें नाहीं, तर मानखंडना मात्र व्हायाची; ह्मणून बाई माझा धीर होत नाहीं.

**राजा:—** ( आनंदानें )

**पद**—राग कालंगडा, ताल धुमाळी.

**हा उत्सुक तव संगमा मग कां भीसी ॥**
**झिडकारिन तुजला असें मनिं कां आणिसी ॥**
**दुर्लभ ती लक्ष्मी जना ॥ जन का तिजसी ॥**
चाल ॥ **आतां संशय न धरीं मनीं ॥ या परिजनीं ॥**
**विपरित बघसी ॥ हा उत्सुक तव संगमा ॥ १ ॥**

**प्रियंवदा:—** अहाग वेडे, जळली भलतीच कांहीं तरी कल्पना ! अग आपल्या अंगावर थंडगार चांदणें पडूं नये म्हणून त्याच्या आड कोणी वस्त्र का धरील ?

**शकुंतला:—** ( हंसून ) बरें तर करतें गीत.

( उठून बसून विचार करिते. )

**राजा:—** हिला पाहतांना माझ्या डोळयाची पापणी सुद्धां लवायची विसरते हें ठीकच आहे. कारण,—

**श्लोक**— राग अलय्याबिलावल, ताल दादरा.
कामदावृत्ताच्या चालीवर.

**चढउनी कशी भ्रूलता वरी ।**
**लेख रचितसे रूपसुंदरी ॥**

**सूक्ष्म गालिं या पुलक जे धरी ।**
**हृदयीं टोंचती कंटकापरी ॥ १ ॥**

**शकुंतला:—** गड्यांनों झालें गीत तयार; पण बाई ल्याहायचें कसें?

**प्रियंवदा:—** त्याची नको काळजी. हीं बघ राघूच्या पोटासारखीं कमळाचीं नाजूक पानें आहेत, त्यांच्यावर नखानें लिही म्हणजे झालें.

**शकुंतला:—** ( त्याप्रमाणें लिहून ) हं ऐका अं, आतां वाचतें मजकूर, नीट जुळला कीं नाहीं सांगा.

**सख्या:—** हं, वाच.

**शकुंतला:—** ( वाचते. )

राग बरवा, ताल दीपचंदी, गभ्यांच्या चालीवर.

**तव मानस कैसें काय न कळे मुळीं मजला ॥**
**दिनरजनीं करितें हाय, विरहें देह तापला ॥**
**अदयमदन हृदयांतरिं हाणी कठिण शरांचा मार ॥**
**तल्लिन झालें तव चरणीं मी ताप करीं परिहार ॥**
**निष्ठुर छळित मला ॥ ***

**राजा:—** ( पुढें सरसावून )

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**छळितो तुजला परि मज जाळी मन्मथ रात्रंदिवसा ॥**
**कुमुदा मूर्छवि दिनमणि परि गे चंद्रा करि नाहींसा ॥**
**तारक तूंचि मला ॥ हा कर तव करिं मीं दिधला ॥**

**सख्या:—** ( पाहून आनंदानें उभ्या राहतात. ) यावें महाराज. आपण अगदीं वेळेवर आलां, यानें आम्हीं कृतार्थ झालों.

---

* **दिंडी:**–( वरील पद क. देवलकृत आहे. )

**तुझें मन ठाऊक मला नाहीं ॥**
**दुष्ट छळितो हा मदन कसा पाहीं ॥**
**बाण याचे मज फार दुःख देती ॥**
**भेट देउनियां करो तापशांती ॥ १ ॥**

**शकुंतलाः—** ( उभी राहूं लागते. )

**राजाः—** छे छे, बसा, उठायचे श्रम कशाला पाहिजेत ?

**दिंडी–** राग लीलांचरी, ताल दादरा.

**नको उठुं ते कासया सदुपचार ॥**
**अंग झालें विगलीत तुझें फार ॥**
**सूक्ष्म कुसुमें हीं रुतलिं तुझ्या देहीं ॥**
**पुरे मर्यादा नको भीड कांहीं ॥ १ ॥**

**अनसूयाः—** या शिलातलावर एका बाजूस बसावें महाराज.

( राजा बसतो, शकुंतला लाजते. )

**प्रियं०—** तुमचें एकमेकांवर प्रेम किती आहे, हें सांगायाला नको. तें उघडच दिसतें आहे; तरी पण ही आमची मैत्रीण म्हणून माझ्यानें बोलल्यावांचून राहवत नाहीं.

**राजाः—** हो हो, बोला. मनांत आलेली गोष्ट मनांतल्या मनांत ठेविली तर मागून पश्चाताप होतो, बोला.

**प्रियं०ः—** बोलायचें म्हणून काय ? तुमच्या राज्यांत राहणाऱ्या कोणालाही दुःख झालें म्हणजे तें दूर करावें हा तुमचा धर्म आहेना ?

**राजाः—** हो. यावांचून दुसरा कोणता असायचा ?

**प्रियं०ः—**तर मग या आमच्या सखीची ही कशी मदनानें अवस्था करून सोडिली आहे ती पहातच अहां. त्याचें कारण पण आपणच, म्हणून हिची इच्छा पुरवून जीवदान द्या म्हणजे झालें.

**राजाः—** हो, माझ्यावर हा अनुग्रहच झाला; पण एकाचेंच प्रेम असून कसें होतें ? उभयतांचें पाहिजे.

**शकुं०ः—** ( प्रियंवदेकडे पाहून )

राग जंगली, ताल धुमाळी.

ठुंबरीच्या चालीवर ( मनमोहन मिळतां )

**कां आड सखे तूं येशि गे ॥ दिन बहु झाले इकडे येउनि ॥**

**अंतःपुरिंचें सुख तें सेवुनि ॥ असेल त्यांची उत्कंठा**
**मनिं ॥ जाऊं दे परतुनि त्यांसि गे ॥ १ ॥ ***

**राजाः**– सुंदरि,

**पद**– राग पिलु, ताल गजल.

**केलीस अशी काय परीक्षा तुं सखे गे ॥**
**तुजवीण प्रिय मजला कोणी नसे गे ॥ ध्रु० ॥**
**व्याकूल करिति तीक्ष्ण मदनबाण अधिच गे ॥**
**तैशांत असा भाव दुजा धरिशि जरी गे ॥**
**वांचूनि जगीं काय मला सौख्य असे गे ॥**
**शेष असे जीवित तें जाय निघुनि गे ॥ १ ॥**

**अनसूयाः**— महाराज, राजांना ह्मणे कायशा पुष्कळ बायका असतात, तर हिच्या आप्तांना दुःख न होईल अशा रीतीनें हिला पदरांत घ्या म्हणजे झालें.

**राजाः**— अहा ! फार काय सांगूं–

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**कांता बहु जरि मला असती तरि मुख्य दोन समजाची ॥**
**समुद्रवसना वसुंधरा कीं शकुंतला सखि तुमची ॥**
**सांगूं काय आतां । शंका आशि कां मनें अणितां ॥ १ ॥**

**सख्याः**— मग झालें; आतां आमचें कांहीं म्हणणें नाहीं.

**प्रियंवदाः**– ( डोळ्यानें खुणावून ) अनसूये, तो बघितलास का हरिण, कसा चहूंकडे उत्सुकतेनें पाहतो आहे. आपल्या आईला शोधतो आहे वाटतें. चल, आपण तिच्याकडे त्याला नेऊं. ( जाऊं लागतात. )

**शकुंतलाः**— अग, तुम्ही दोघी गेलां तर मला संभाळायला कोण? एक कोणी तरी रहा बाई.

---

*अग, अंतःपुर सोडून इकडे आल्याला फार दिवस झाले, परत केव्हां जाईन असें झालें असेल; तर तूं कशाला आड येतेस ! ( पद देवलकृत. )

**सख्याः—** काय तरी मेलं ! पृथ्वीचें संरक्षण करणारा तो तर तुझ्याजवळ आहे. मग आम्ही कशाला ? ( जातात. )

**शकुंतलाः—** अरे कपाळा ? गेल्याच कीं या; आतां काय करूं ?

**राजाः—** पुरे आतां, वाईट वाटायला नको. हा पहा तुझा सेवक जवळ तत्पर आहे.

**पद**—राग जोगी असावरी, ताल त्रिताल.

अतिशय शोकें व्याकुल, या चालीवर.

**भिउं नको जिवलग सुंदरि कांहीं दास तूझा जवळि असे हा ॥**
**घेउनी पंकजपत्राचा हा पंखा घालुं काय शीत वारा ॥**
**बघ ही तनु कशी घर्मानें डवडवली भिजुनि गेला पदर सारा ॥**
**सखये मांडिवरी घेउनी तुझ्या चरणां चुरूं काय पद्मताम्रा ॥**
**शिणवूं नको देहा ॥ भिऊं नको० ॥ १ ॥**

**शकुंतलाः—** इश्श, ज्यांना मी मान द्यायचा त्यांच्याकडून कशी सेवा करून घ्यावी ? ( जाऊं लागते. )

**राजाः—** सुंदरी ! बाहेर उन्हाचा ताप कोण ! आणि तशांत तुझ्या शरीराची अशी दशा झाली आहे. तर—

**पद**—राग आनंदभैरवी, ताल दीपचंदी.

अंक २ यांतील नाहीं कोणीही हुंगीलें, या चालीवर.

**सोडोनीयां सुकुसुमशयना टाकोनी स्तनकमलावरणा ॥**
**जाऊं नको उन्ह हें भारी सुख नाहीं तुझ्या शरिरीं ॥**

( बळेंच तिला माघारीं वळवितो. )

**शकुंतलाः—** हें काय मेलें ! अगदीं का मर्यादा टाकायची ?—

**पद**— राग झिंजोटी, ताल त्रिताल.

गज्जल ( गरहमने दिलसनमको दिया, या चालीवर )

**मी तप्त जरी मदनशरें विनय सोडुं का ॥**
**अनुरक्त जरी याच पदीं विनय सोडुं का ॥ ध्रु० ॥**

**गुरुजनांसि कळुनि वळुनि होय तें बरें ॥**
**जरि इष्ट तुह्मां होय तरि विनय सोडूं का ॥ १ ॥ ***

**राजा:—** वा: ! काय भित्रा स्वभाव हा ! वडील माणसांना इतकें भिण्याची गरज नाहीं. तुझा बाप कुलपति कण्वमहर्षि धर्मज्ञच आहे. तो कधींही याबद्दल दोष ठेवणार नाहीं:—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**गंधर्वांच्या विधिनें करिती लग्नें राजर्षिसुता ॥**
**बहु मानील्या आप्तजनांनीं कोप न ये तत्ताता ॥**
**भीशी काय अशी । सोडुन मज तूं कां जाशी ॥**

**शकुंतला:—** जाऊं द्या मला; पुन: माझ्या मैत्रिणींना मला विचारलें पाहिजे.

**राजा:—** बरें, जाऊं देईन तुला.

**शकुंतला:—** केव्हां ?

**राजा:—**

**पद**—राग भैरवी, ताल त्रिवट.

**पिउनि हें अधरामृत तें सखये ॥ मग सोडीन तुला गे ॥ पि०॥ ध्रु० ॥ जें फुललें कुसुम खासें । मधुपा नच सोडवे चव घेतलीया । मज तान बहु रसपान सुखवि गे ॥ पिउनि० ॥ १॥**

( तिची हनुवटी वर करून चुंबन घेऊं लागतो, शकुंतला त्याला चुकविते. )

( पडद्यांत. )

" हे चक्रवाकी; आपल्या जिवलगाला काय सांगायचें असेल तें सांग; ही पहा रात्र जवळ येऊन ठेपली. "

**शकुंतला:—** ( घाबरून ) महाराज ! गौतमी अत्याबाई माझ्या समाचारासाठीं इकडे येत आहेत, तर या झाडाच्या आड लपावें.

**राजा:—** ठीक आहे. ( लपून उभा राहतो. )

---

* मदनानें मी संतप्त झालें ह्मणून माझी मी मुखत्यारीण नाहीं.( पद देवलकृत. )

( तदनंतर हातांत भांडें घेतलेली गौतमी व दोघी सख्या येतात. )

**सख्याः**— अत्याबाई, इकडून या अशा.

**गौतमीः**— ( शकुंतलेजवळ जाऊन ) कसें काय माझी बया ती ! आतां बरें आहेना ?

**शकुंतलाः**— हो अत्याबाई, आतां पुष्कळ बरें आहे.

**गौतमीः**— हें मीं तीर्थ आणलें आहे तें तुझ्या अंगावर शिंपडतें म्हणजे तुझें दुखणें अगदीं नाहींसें होईल. ( शकुंतलेच्या डोक्यावर पाणी शिंपडते. ) हा पाहिलास का ? दिवस अगदीं बुडायला आला. तर चल घराकडे जाऊं.

( सर्व चालूं लागतात. )

**शकुंतलाः**— ( आपल्याशीं ) काय मेलें माझें हृदय तरी ? मघां ऐन सुखाच्या वेळेला तूं आपला भित्रेपणा सोडला नाहींस, मग आतां वियोग झाला म्हणून हुरहुर कशाला लावून घेतेस. ( दोन पावलें चालून मोठ्यानें )

**पद**—राग पिलु, ताल त्रिताल.

सदाशिव धुंदी, या चालीवर.

**मना तळमळसि, उगिच कां असा हळहळसि, प्रथम फसलेंसी ॥ ध्रु० ॥ ऐन सुखाच्या समयीं भीति धरुनि कसें बसलेंसी ॥ मना० ॥ १ ॥ लतामंडपा, सुख सेवाया, येइन पुनः तुजपासीं ॥ मना० ॥ २ ॥***

( शकुंतला, गौतमी व दोन सख्या निघून जातात. )

**राजाः**— ( पूर्व स्थानावर येऊन सुस्कारा टाकून ) कोणचीही गोष्ट आपल्याला प्राप्त करून घेण्यासाठीं जितकी अधिक खटपट करावी तितकीं त्याला जास्त विघ्नें पहा,

---

* हे संतापहारका लतामंडपा ! तुझ्यापासून मला पुष्कळ सुख झालें, तर पुनः तसेंच सुख भोगायला तुझ्याकडे येईन. ( पद देवलकृत. )

पद—राग आनंदभैरवी, ताल दादरा.

नको नको ख्रिसंगनामग्रहण, या चालीवर.

**काय मला भूल पडलि, भान हरपलें ॥**
**तें मुख वर केलें परी नाहिं चुंबिलें ॥ काय० ॥**
**॥ ध्रु० ॥ सुंदरिनें अंगुलिनीं ओंठ झांकिले ॥**
**नको नको ऐसें ह्मणत तोंड फिरविलें ॥**
**प्रेमभरें तिनें अर्ध नेत्र मिटियले ॥**
**ऐशा त्या ऐन रंगीं व्यंग जाहलें ॥ काय० ॥ १ ॥**

बरें आतां कुणीकडे जावें? अथवा कोणीकडे जायचें! येथेंच माझ्या लाडकीनें उपभोग घेतलेल्या या मंडपांतच घटकाभर बसूं. ( चोहोंकडे पाहून )

श्लोक--राग पिलु.

**शय्या पुष्पमयी शिलेवरि दिसे तन्वीशरीरांकिता ।**
**दावी मन्मथलेख हाहि नलिनीपत्रस्थ विम्लानता ॥**
**हातांतोनि गळे बिसाभरण हें इत्यादि पाहे तदा ।**
**वाटे शून्य जरी लतागृह तरी सोडूं नये तें कदां ॥**

( पडद्यांत. )

**श्लोक**

**" सूर्याचा जंव होय अस्त हवना आरंभ जों होतसे ।**
**वेदीभोंवति राक्षसांचि तंव ती विक्राळ छाया दिसे ॥**
**संध्याकालिकमेघपंक्तिसदृशावर्णेचि जी भासते ॥**
**भीती भूपति या सुधानजनिता आम्हां अति वाटते ॥**

**राजाः**— हां! भिऊं नका, हा मी आलों.

[ निघून जातो. ]

**( तिसरा अंक समाप्त. )**

---

**प्रियंवदा:**— खरेंच बाई. ( दोघी पुनः फुलें तोडूं लागतात. )[पडद्यांत] " कोणी आहे कीं नाहीं आश्रमांत ? "

**अनसूया:**— ( कान देऊन ) गडे, कोणी अतिथि आला आहेसें वाटतें.

**प्रियंवदा:**— शकुंतला आश्रमांत आहेच. ( आपणाशीं ) ती आहे खरी; पण तिचें मन कुठें जाग्यावर आहे ?

**अनसूया:**— बरें, पुरे झालीं इतकीं फुलें, चल जाऊं आतां. (पडद्यांत) " काय पोरी, अतिथींचा अपमान करतेस ? तर घे हा शापः—

**श्लोक.**

**चिंता जयाची करूनी अनन्यधी ।**
**न जाणसी हा अतिथी तपोनिधी ॥**
**स्मरेल तूंतें न जरि प्रबोधिसी ।**
**प्रमत्त जैसा घडल्याहि गोष्टिसी ॥ १ ॥**

**प्रियंवदा:**— अग बाई, फार वाईट गोष्ट झाली. शकुंतलेचें मन जाग्यावर नसल्यामुळें तिच्या हातून कोणातरी सत्पुरुषाचा खचित अपमान झाला. ( पुढें पाहून ) अगबाई, हा कोणी भलतासलता नव्हे. शीघ्रकोपी दुर्वासऋषि हा ! शाप देऊन पाय हापटीत धडपडत परत गेली वाटतें स्वारी. खरेंच आहे, भाजण्याचें सामर्थ्य विस्तवाखेरीज कुणाला असणार ?

**अनसूया:**— तर मग जा बाई, पायां पडून त्यांना माघारी परतीव. मी इकडे त्यांच्या पूजेची तयारी करतें.

**प्रियंवदा:**— बरें. ( जाते. )

**अनसूया:**— ( गडबडीनें ठेंच लागलीसें दाखवून ) जळ्ळें मेलें, ठेंच लागल्यानें सारीं फुलें सांडलीं परडींतलीं. ( वेंचू लागते )

( प्रियंवदा प्रवेश करिते. )

**प्रियंवदा:**— अनसूये, जो स्वभावानें वांकडा, त्याची समजूत कुणाच्यानें होणार ! पण बाई आला थोडासा वळणीवर.

**अनसूया**:— ( हंसून ) एवढें तरी मोठें भाग्यच समजायचें. कसें काय बरें झालें ?

**प्रियंवदा**:— हें बघ माघारी जेव्हां स्वारी परतेना, तेव्हां मी विनवणी केली, "महाराज, आपलें सामर्थ्य माहीत नसल्यामुळें शकुंतलेच्या हातून चूक झाली, तशांत हा पहिलाच अपराध समजून क्षमा करावी."

**अनसूया**:— बरें पुढें ?

**प्रियंवदा**:— मग 'माझा शाप कांहीं टळायचा नाहीं, पण कांहीं खुणेचा जिन्नस दाखविला म्हणजे तो राजा ओळखील ' असें पुटपुटत तेथल्या तेथें दिसेनासे झाले.

**अनसूया**:— बरें झालें बाई; धीर धरायला आतां जागा झाली. त्या राजानें जायच्या वेळीं आठवणीसाठीं म्हणून आपल्या नांवाची अंगठी शकुंतलेच्या बोटांत घातली आहे. ती खूण दिली म्हणजे झालें.

**प्रियंवदा**:— चल गडे आतां, पुजेचें तेवढें आटपूं. ( फिरतात ) अनसूये, पाहिलेंस का ? डाव्या हातावर डोकें टेंकून कशी चित्रासारखी प्रियसखी बसली आहे ती ! तिचा जीव सगळा लागला आहे नवऱ्याकडे. तिचें तिलाच भान नाहीं. मग दुसरें आलें गेलेलें तिला कसचें समजणार ?

**अनसूया**:— प्रियंवदे, हें आतांचें वर्तमान किनई आमच्या दोघींच्याच तोंडीं राहूं दे. तिला कळतां उपयोग नाहीं. नाहींतर ती आहे कोंवळया मनाची; कळलें म्हणजे काय अवस्था करून घेईल कोण जाणे.

**प्रियंवदा**:— हें का सांगायला हवें ? जाईच्या मुळांत आधणाचें पाणी का कोण घालील ?

( दोघी निघून जातात. )

[ तदनंतर झोंपेंतून उठलेला शिष्य प्रवेश करितो. ]

**शिष्य**:— ( जांभई देऊन ) काश्यपगुरुजी सोमतीर्थाहून परत आले, वेळ बघून ये म्हणून त्यांनीं मला सांगितलें आहे, तर बाहेर जाऊन

अजून रात्र किती राहिली आहे, तें पाहून येतों (इकडे तिकडे फिरून पाहून) अबब! अगदीं उजाडलेंच! हें पहा,–

पद—राग भुपाळी, ताल दादरा.

**किती तरी पहांटेची वेळ मला मानसिं सुख देते ॥**
**जात शशी अस्तातें॥ उगवे रवि इकडे हा॥**
**अस्तोदय यांचे ते नियमिति लोकांतें ॥ किती० ॥ १ ॥**
**जातां शशि कैरविणी ॥ तीच न दे सुख नयनीं ॥**
**शोभा तिचि आतां ते स्मृतिगत मज होते ॥ किती० ॥ २ ॥**
**इष्टविरह देई जे ॥ कष्ट घोर अबलांतें ॥**
**सोसाया बिकट बहू वदवेना मातें ॥ किती० ॥ ३ ॥**

[ अनसूया बाईनें प्रवेश करिते ]

**अनसूया**:— मला संसारांतलें कांहीं कळत नाहीं खरें; पण त्या राजानें शकुंतलेशीं वाईट आचरण केलें हें समजत नाहीं असें नाहीं.

**शिष्य**:– होमाची वेळ झाली असें गुरुजींना जाऊन सांगावें.

( शिष्य निघून जातो )

**अनसूया**:—– पण आतां हें समजून काय उपयोग ? मला रोजचें कामधाम देखील मेलें सुचत नाहीं. असो; आतां दैवावरच हवाला घातला पाहिजे. गरीब बिचारी निर्मळ अंतःकरणाची माझी मैत्रीण शकुंतला, त्या मेल्या दैवानेंच तिला त्या कपटी राजावर विश्वास ठेवायला लावलें. पण बाई, हें सारें कदाचित् त्या दुर्वासाच्या शापाचेंच तर फळ नसेलना ? नाहींतर तो राजा जायच्या वेळेस किती गोडगोड बोलला आणि अजून एक पत्र देखील पाठवीत नाहीं. बरं इकडून खुणेसाठीं ती आंगठी त्याच्याकडे धाडून दिली तर ? पण पाठवावी कोणाबरोबर ? हे सारे तपस्वी कसे निष्ठुर स्वभावाचे आहेत. शकुंतलेचा यांत कांहीं दोष नाहीं, हें मला पक्कं ठाऊक आहे; पण आतां बाबा आले आहेत; त्यांना दुष्यंतराजानें शकुंतलेशीं लग्न लावलें आणि

तिला आतां कांहीं दिवस गेले आहेत, हें वर्तमान सांगायला माझा कांहीं बाई धीर होत नाहीं. आतां करावें तरी काय ?

[ प्रियंवदा प्रवेश करिते. ]

**प्रियंवदा:**—गडे, चल चल लवकर, आज शकुंतला सासरीं जाणार. तिची तयारी करायला पाहिजे.

**अनसूया:**—म्हणजे ग काय ?

**प्रियंवदा:**—अग, मी नुकतीच शकुंतलेच्या समाचारासाठीं गेलें होतें.

**अनसूया:**—मग ?

**प्रियंवदा:**—तेव्हां ती लाजेनें खालीं मान घालून बसली होती. तिला बाबांनीं पोटाशीं धरून मोठ्या प्रेमानें म्हटलें:—" बाळे, ज्याप्रमाणें यजमानाचे डोळे धुरानें भरले असतांही त्याच्या हातून अग्नीच्याच मुखांत आहुति पडावी तसें हें सुदैवानें झालें आहे, आणि उत्तम शिष्याला विद्या शिकविली म्हणजे जसा आनंद होतो, तसा मला झाला आहे; तर मी आजच ऋषींना बरोबर देऊन तुझी सासरीं रवानगी करून देतों. "

**अनसूया:**—अग, पण बाबांना हें वर्तमान सांगितलें तरी कोणीं ?

**प्रियंवदा:**—ते किनई सकाळीं होमशाळेंत गेले, आणि तिथें बाई आकाशवाणी झाली.

**अनसूया:**—( आश्चर्यानें ) खरेंच ? काय वाणी झाली सांग तरी.

**प्रियंवदा:**—सांगतें ऐक—

**श्लोक**

**धरी दुष्यंत तेजातें । भूमिकल्याण व्हावया ॥**
**कन्यका सम जे विप्रा । अग्निगर्भ शमीपरी ॥**

**अनसूया:**—(प्रियंवदेस आलिंगून) गडे, हें फार चांगलें झालें. मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं ? पण बाई, आजच शकुंतला जायची, हें ऐकून जिवाला हुरहुर वाटते.

**प्रियंवदा:**—गडे, आमची हुरहुर जाईल मेली कशी तरी; त्या बिचारीचें कल्याण होवो म्हणजे झालें.

**अनसूया:**—तर मग तो माडाच्या पानांचा करंडा त्या आंब्याच्या झाडावर टांगून ठेवला आहे, त्यांत पुष्कळ दिवस टिकणारी केसर-माळा तिला सासरीं जायच्या वेळेस द्यायची म्हणून ठेविली आहे, ती घेऊन ये. मीही मृगरोचन, तीर्थमृत्तिका, कोवळया दुर्वा, हें ओंटी भरण्याचें साहित्य घेऊन येतें.

**प्रियंवदा:**— बरें, तर आण.

( अनसूया जाते, प्रियंवदा फुलें वेंचल्यासारखें करिते. )

(पडद्यांत). " गौतमी, शकुंतलेला पोंचवायला तुम्हाला गेलें पाहिजे, तुम्ही तयार असा म्हणून शार्ङ्गरवादिक शिष्यांस सांग. "

**प्रियंवदा:**— ( ऐकलेंसें करून ) अगबाई अनसूये, चल ग चल, हें पहा हस्तिनापुराला जाणाऱ्या ऋषींना हांका मारताहेत.

( अनसूया ओंटीचें साहित्य घेऊन यते. )

**अनसूया:**— गडे, ही मी आलें, चल जाऊं. ( फिरतात. )

**प्रियंवदा:**— ( पाहून ) ही पहा शकुंतला पहांटेस न्हाऊं घालून बसविली आहे; आणि शेजारणी बाया ओटीचें साहित्य घेऊन गाणीं म्हणत तिच्या जवळ बसल्या आहेत, चला जाऊं तिकडे.

( तदनंतर वर सांगितल्याप्रमाणें बसलेली शकुंतला प्रवेश करिते. )

**पहिलीबाई:**— ( ओंटी भरून ) शकुंतले तुझा नवरा तुला आपली पट्टराणी करो.

**दुसरीबाई:**— मुली, तुला पराक्रमी पुत्र होवो.

**तिसरीबाई:**— बये, तूं नवऱ्याची आवडती हो.

( गौतमीशिवाय सर्व बाया निघून जातात. )

**दोघी सख्या:**— गडे, तुझें कल्याण असो.

**शकुंतला:**— सख्यांनो, आलां ? बसा येथें.

( मंगलपात्र घेऊन सख्या बसतात. )

**प्रियंवदाः**— गडे, अशी समोर बैस, हीं फुलें तुझ्या वेणींत घालूं दे.

**शकुंतलाः**— सख्यांनो:—

**पद**—राग पिलु, ताल धुमाळी.
आज आक्रूर हा नेतो श्रीकृष्णाला, या चालीवर.

**अजि शेवटचा, लाभचि हा ममतेचा, मज होय तुमच्या करिंचा ॥ बहु दावियलें प्रेम निरंतर अपुलें, कधीं नाहीं अंतर पडलें ॥ प्रतिदिवशीं कोमल करिंची, वेणी फणी आतां कैंची ॥ त्या आशेचा लेश न उरला साचा, शोक न आवरे मनिंचा ॥ १ ॥***

( डोळ्यांत अश्रु आणते. )

**दोघीः**— अशा मंगलकालीं रडूं नये गडे. ( तिचे डोळे पुसून वेणी घालतात. )

**प्रियंवदाः**— अहाहा ! ! असल्या या सुंदर रूपाला दागिन्यांनीं किती शोभा आली असती ! पण या आश्रमांत फुलांवांचून दुसरें काय मिळावयाचें आहे ?

( दागिने घेऊन दोन ऋषिकुमार प्रवेश करितात. )

**ऋषिकुमारः**— हं, हे घ्या दागिने, घाला अक्काच्या अंगावर.

( पाहून सर्व विस्मय करितात. )

**गौतमीः**— बाळा नारदा, कोठून रे आणलेस हे ?

**पहिला ऋषिकुमारः**— अत्याबाई, गुरुजींच्या सामर्थ्यानें.

**गौतमीः**— म्हणजे ? मानसिक सिद्धीनें का केले ?

**दुसरा ऋषिकुमारः**— तसें नव्हे. गुरुजींनीं आम्हांला सांगितलें कीं, “ जा आणि शकुंतलेसाठीं झाडांचीं फुलें काढून आणा. ” आम्ही तीं आणायला गेलों, तों तेथें,—

---

* येथून पुढें तुमच्या हातची वेणी फणी कशानें मिळणार ? ( पद देवलकृत.)

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**क्षीरतरूनें शालु दिला हा लाक्षारस दुसऱ्यानें ॥**
**इतर लतांनीं हात उभारुनि दिधले हे दागीने ॥**
**ऐशी झालि कृति ॥ गुरुची अपार संपत्ती ॥ १ ॥**

**प्रियंवदा**:— ( शकुंतलेकडे पाहून ) गडे, यावरून तूं नवऱ्याच्या घरीं गेलीस म्हणजे मोठ्या राज्यलक्ष्मीचा अनुभव घेणार.

**शकुंतला**:— ( लाजते. )

**पहिला ऋषिकुमार**:— गौतमा, गुरुजींचें स्नान आटपलें असेल, तर चल आतां, ही वनस्पतींनीं केलेली सेवा त्यांना कळवूं.

**दुसरा ऋषिकुमार**:— ठीक आहे.

( दोघे निघून जातात. )

**अनसूया**:— गडे, आम्हीं कधीं असले दागिने घातले नाहींत, पण आम्हीं चित्रें पाहिलीं आहेत. त्यांवरून कोणता दागिना कोठें घालायचा, हें आम्हांला ठाऊक आहे तसे हे तुला घालतों.

**शकुंतला**:— अग, तुम्ही चतुरच आहां.

( सख्या दागिने घालतात. )

( त्यानंतर स्नान केलेला काश्यपऋषि प्रवेश करितो. )

**काश्यप**:—

**पद**—राग जोगी, ताल धुमाळी.

**( जाते कीं मम शकुंतला ही आजचि पतिसदना ॥**
**उत्कंठेनें काळिज तुटतें हुरहुर लागे मना ॥ ध्रु० ॥ )**
**गहिंवर दाटे कंठिं कसा ये बाष्पपूर नयनां ॥**
**चिंतेनें जड दृष्टी झाल्या कांहिंच वदवेना ॥**

**मी वनवासी स्नेहि हिचा पण वियोग साहवेना ॥**
**न कळे कैसें गृहस्थ सोशिती कन्याविरहांना ॥***

( इकडे तिकडे फिरतो )

**अनसूयाः**—गडे, दागिने घालून झाले; आतां हा शालू नेस; आणि हा शेला पांघर.

**शकुंतलाः**— ( तसें करिते )

**गौतमीः**— मुली, आनंदाश्रूंनीं भरलेल्या नेत्रांनीं तुझा पिता इकडे येत आहे तर त्याला नमस्कार कर.

**शकुंतलाः**—( लाजून ) बाबा नमस्कार करतें.

**काश्यपः**—वत्से.

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**जशी ययातिस शर्मिष्ठा तशि तूं हो स्वपतिस मान्य ॥**
**पूरुपरी सम्राजकुमारा प्रसवुनि करिं कुल धन्य ॥**
**वर हा तुज साजे । घे बहु आशिर्वाद माझे ॥ १ ॥**

**गौतमीः**— महाराज, हा वरच होय; आशीर्वाद नव्हे.

**काश्यपः**— मुली, मी नुक्ताच या कुंडांत होम केला आहे; अशा या अग्निनारायणाला प्रदक्षिणा कर. ( सर्व प्रदक्षिणा करतात. )

---

गड्यानों कृष्णगडी आपुला या चालीवर.

***लाडकि माझी शकुंतला जाते कीं पतिसदनाला ॥ उत्कंठाविष हृदयीं चढलें जिव करपुनि गेला ॥ जाते०॥ ध्रु०॥ गहिंवर येउनि कंठ दाटतो ॥ बाष्पपूरनयनांसी सुटतो ॥ चिंताजडदर्शन मी होतों ॥ शून्य दिसे मजला ॥ जाते० ॥१॥ जनक नव्हे स्नेहि मि वनवासी ॥ वियोगपीडा जरि मज ऐसी ॥ न कळे कैसा गृहस्थ सोसी ॥ कन्याविरहाला ॥ जाते० ॥ २ ॥**

**काश्यपः**— (ऋग्वेदाच्या छंदानें तुला मी आशीर्वाद देतों. )

**अमी वेदिं परितः क्लृप्तधिष्ण्याः समिद्वन्तः**
**प्रान्तसंस्तीर्णदर्भाः ॥ अपघ्नन्तो दुरितं हव्य**
**गन्धैर्वैतानास्त्वां वन्हयः पावयन्तु ॥**

मुली, चालूं लाग आतां. ( इकडे तिकडे पाहून ) शार्ङ्गरवादिक कोठें आहेत ते ?

[ शिष्य येतात. ]

**शिष्यः**— महाराज, हे आम्ही तयार आहोंत

**काश्यपः**— आपल्या बहिणीला वाट दाखवा.

**शिष्यः**— अशी इकडून ये ताई.

( सर्व चालूं लागतात. )

**काश्यपः**— ( चहूंकडे पाहून ) अहो तपोवनांतील वृक्षांनोः—

**पद**—राग जोगी, ताल धुमाळी.

**जातसे पतिसदनिं आज ति माझि दुहितृ शकुंतला ॥**
**आश्रमांतिल तरुवरांनों द्यावि आज्ञा तुम्हि तिला ॥ध्रु०॥ )**
**पान न करी जल जि आधीं तुह्मां उदक न पाजितां ॥**
**हौस जिस बहु पल्लवांची राग ये बहु तोडितां ॥**
**पाहुनी नवकुसुम तुमचें हर्ष होई बहु जिला ॥ जातसे॥१॥***

---

काय मला भूल पडली, या चालीवर.

*** जात भर्तृमंदिरासि मम शकुंतला ॥**
**द्या निरोप आश्रमस्थ वृक्षहो तिला ॥ जात० ॥ ध्रु० ॥**
**पाजिल्याविणें तुह्मांसि पान नच करी ॥**
**नवकिसलयमंडनाचि हौस इस जरी ॥**
**होय दुःख तुह्मां म्हणुनि तोडिना करीं ॥**
**कुसुमोद्भव बघुनि तुह्मां उत्सवचि जिला ॥ जात० ॥ १ ॥**

[कोकिळेचा शब्द ऐकूं आलासें दाखवून.]

*पद–राग व ताल सदर.

**बघ दिलें तरूंनीं ॥ अनुमत जायाला ॥ ध्रु० ॥**
**कोकिलशब्दद्वारें सुचविती ॥ भाव मनामाधिला ॥ १ ॥**

( पडद्यांत. )

पद–राग व ताल सदर.

**"मृदु रेणू मार्गी ॥ तुज लागो ॥ सरोवरें बहु जागीं ॥**
**लागुनि वाट सरो ॥ ताप हरो ॥ छाया तरु दो भागीं ॥**
**बाई जावें गे ॥ १ ॥ अनुकूलचि वारा ॥ मंद बरा ॥**
**लागुनि सुखवु शरीरा ॥ मार्गी शुभंकरा लंघोनी जाशिल**
**आपुल्या नगरा ॥ बाई जावें० ॥ २ ॥**

( ऐकून सर्व विस्मय करितात. )

**गौतमीः**– मुली, तुजवर प्रीति करणाऱ्या या वनदेवतांनीं तुला निरोप दिला; तर त्यांना नमस्कार कर.

**शकुंतलाः**— ( नमस्कार करून, प्रियंवदेच्या कानांत ) गडे प्रियंवदे, जरी त्यांना बघण्याविषयीं मी उत्कंठित झालें आहे, तरी दुःखामुळें हें तपोवन सोडून जाण्याला माझें पाऊल पुढें पडत नाहीं. ]

**प्रियंवदाः**— गडे, हें तपोवन सोडून चाललीस म्हणून तुला एकटीलाच वाईट वाटतें असें समजूं नको; तूं जातेस म्हणून हें तपोवन देखील उदास झालें आहे. पहा हे हरिण तोंडांत घेतलेल्या दर्भाचा घांस परत टाकतात, मोरांनीं तर नाचणेंच सोडून दिलें. वेली देखील अश्रुबिंदूप्रमाणें टपाटपा पानें गाळीत आहेत.

---

बघुनि सुभद्रेला, या चालीवर.

* **दिधलें तुज तरूंनीं ॥ अनुमत जाया पतिसदनीं ॥**
**नाहीं त्यां बोलाया वाणी ॥ म्हणुनि कोकिलरवामिष करुनी ॥**
**प्रगट भाव केला हा त्यांनीं ॥ केली पाठवणी ॥ तव या**
**काननबंधूनीं ॥ दिधलें० ॥ १ ॥**

**शकुंतला:**— (कांहीं आठवलेंसें करून) बाबा, माझी बहीण जी लता वनज्योत्स्ना, तिचा मी निरोप घेतें.

**काश्यप:**— खरेंच, तुझी तिजवर सख्ख्या बहिणीप्रमाणें प्रीति आहे. ही बघ इकडे उजव्या अंगाला आहे.

**शकुंतला:**— ( वेलीजवळ जाऊन ) बाई, वनज्योत्स्ने—

**पद**—राग आनंदभैरवी, ताल दिपचंदी.

नाहीं कोणीही हुंगीलें, या चालीवर.

**बाई तूं या आम्रतरूसीं ॥ प्रेमालिंगनदानीं रमसी ॥ भेटें मजला या शाखांनीं ॥ जातें दूरी तूज सोडोनी ॥ १ ॥***

**काश्यप:**— बाळे.

**पद**—राग जिल्हा, मांड ताल दीपचंदी.

**काय कथूं या कालीं ॥ मम चिंता गेली ॥ ध्रु० ॥**
**तुजसाठीं जो पति मीं ठरविला ॥**
**त्यानें तुज करीं धरिली ॥ गे मम० ॥ १ ॥**
**ही तव भगिनी नवमल्लीका ॥**
**आम्रतरूस मिळाली ॥ गे मम ॥ २ ॥§**

तर आतां वाटेला लाग.

**शकुंतला:**— ( सख्यांकडे वळून ) सख्यांनो, हिला आतां मीं तुमच्या ओंटींत घातली आहे.

---

* जरी आम्रवृक्षाची तूं बायको झाली आहेस, तरी इकडच्या या ढाळ्यांनीं मला आलिंगन दे; कारण आजपासून तूं मला अंतरणार. ( पद देवलकृत. )

कोण तुजसम सांग मज, या चालीवर.

**धन्य दिन हा काय कथुं या कालीं ॥ आशा मम पुरली ॥ पूर्वनिश्चित राजानें तुज वरीली ॥ मम चिंता सरली ॥धन्य०॥ तेविं तव ही नवमल्लिका भगिनी ॥ कन्या ममसुमनी ॥ आम्रतरूतें अनुरूपा पाहोनी ॥ वरिलें जावोनी ॥ धन्य० ॥**

**दोघी सख्या:**— पण बाई, आम्हांला कोणाच्या ओंटींत घातलें आहेस ? [ रडूं लागतात. ]

**काश्यप:**—अनसूये,आतां रडणें पुरें करा. तुम्हीं दोघींनीं शकुंतलेची समजूत करायची, तें सोडून देऊन तुम्हींच हें काय असें करितां ?

( सर्व इकडे तिकडे फिरतात. )

**शकुंतला:**— बाबा, ही आश्रमाजवळ हिंडणारी हरिणी गर्भारपणाच्या दुःखानें भारी कष्ट सोशीत आहे. देवाच्या दयेनें हिची नीटपणानें सुटका झाली, म्हणजे कोणाबरोबर तरी मला निरोप धाडालना ?

**काश्यप:**— हें मी कधीं विसरणार नाहीं.

**शकुंतला:**— [ अडखळलेंसें करून ] अगबाई, माझ्या ओंच्याला कोण ओढीत आहे ? [ मागें पहाते. ]

**काश्यप:**— मुली, दुसरें कोण ?

**पद**—राग भीमपलासी, ताल धुमाळी.

**ज्याच्या तोंडीं दर्भानें व्रण झाला ॥ बरें केलें लावुनि**
**तूं तैल ज्याला ॥ धान्यमुष्टि चारूनी वाढवीला ॥**
**पुत्र तैसा प्रेमें तूं पाळियेला ॥ १ ॥**
**पहा तूझ्या तो ओढी वसनाला ॥ समजावीं त्या**
**अपुल्या हरिणबाला ॥ ज्याच्या तोंडीं० ॥***

---

लाल झाली कोपानें, या चालीवर.

***बालपणीं दर्भांकुर टोंचुनि व्रण झाला ज्याच्या वदनीं॥ दयार्द्रचित्तें बरें करिसि तूं इंगुदितैला लावोनी ॥ बाल० ॥ ध्रु० ॥ शामकाचें धान्य कुटोनी निजहस्तें तूं चारियलें ॥ प्रेमानें ज्या अंकिं घेउनी पुत्रापरी तूं वाढविलें ॥ वसन ओढि या भावानें कीं “ चाललीस मज कां त्याजिलें ” ॥ समजावीं त्या हरिणबालका अश्रुपूर ये तन्नयनीं ॥ बाल० ॥ १ ॥**

**शकुंतला**:— बाळा, मी तुला आतां सोडून चालले. माझ्या मागून कशाला येतोस ?

***पद.**–[ गंगेत लोटा हो या चालीवर. ]

राग असावरी, ताल त्रिताल.

**जाई परतोनी, बाळा, जाई परतोनी ॥ निष्ठुर मी तुज**
**टाकुनि जातें, येशि कशाला माझ्या मागोनी ॥ ध्रु० ॥**
**जन्मतांच तव जननि गेली सोडुनि तुज या तपोवनीं ॥**
**मीच पाळिलें लाड करोनी, कांहिं न अडलें कीं तुझें ।**
**गेलें जरी मी, काय उणें तुज,सांभाळिती बाबा तुजलागुनि ॥**
**जाई० ॥ १ ॥**

( असें म्हणून रडत चालूं लागते. )

**काश्यप**:— मुली, डोळे पूस. तुझे हे नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून गेले आहेत, त्यामुळें या उंचसखल मार्गांत तुझीं पावलें वांकडींतिकडीं पडताहेत.

**शार्ङ्गरव**:— महाराज उदकाच्या तारापर्यंतच आप्तजनांनीं पोंचवायला जावें असें शास्त्र आहे; तर हें सरोवर आहे, याच्या कांठीं उभें राहून काय निरोप सांगायचा तो सांगून आपण परतावें.

**काश्यप**:— बरें तर, या वटवृक्षाच्या छायेखालीं उभे राहूं. ( तसें करून आपल्याशीं ) दुष्यंतराजाला योग्य असा निरोप काय धाडावा बरें ? ( चिंतन करीत राहतो. )

**शकुंतला**:— ( सख्यांच्या कानांत ) गडे अनसूये, इकडे बघ, हा चक्रवाक पक्ष्यांचा जोडा. यांच्यामध्यें कमळाचें पान आड आल्यामुळें

---

* बाळा उपजतांच तुझी आई तुला सोडून गेली तरी तुझें कांहीं अडलें नाहीं. आतां मी सोडून गेलें तरी बाबा तुझा सांभाळ करतील. फिर बाळा माघारी. ( पद देवलकृत. )

ही चक्रवाकी पहा कशी आरडून आक्रांत करीत आहे ती! हें पाहून माझ्या बाई पोटांत चर्र होतें.

**अनसूयाः**— गडे, असलें मनांत आणूं नको. ही चक्रवाकी सुद्धां आपल्या पतीवांचून सगळी रात्र घालविते. विरहदुःख कितीही कठीण असलें तरी पुढच्या आशेवर तें सहन करतां येतें.

**काश्यपः**— शार्ङ्गरवा, शकुंतलेला पुढें उभी करून त्या राजाला असें सांग.

**शार्ङ्गरवः**— कसें काय सांगायचें महाराज ?

**काश्यपः**—

पद–राग शंकराभरण. ताल झंपाप्रबंध.

नमो भक्तसुरतरुलत ( देविललिते ) या चालीवर.

**निग्रहानुग्रहीं दक्ष आह्मि जाण हें ॥**
**आण मनिं आपुलें उच्च कुलही ॥**
**बांधवा पुशिलयावांचुनी ही वरी ॥**
**केंवि तुज हें मनीं आण राजा ॥**
**मुला सांग नृपतीस संदेश माझा ॥**
**कासया भीड ती स्पष्ट काजा ॥ मुला० ॥ ध्रु० ॥**
**काय बहु सांगणें किमपि नच मागणें ॥**
**पत्नि वर्गांतरीं हीस पाहें ॥**
**दैवबल जें पुढें, तेंवि तैसें घडे ॥**
**आह्मि बोलुं नये हेंचि समजा ॥ मुला० ॥ १ ॥**

**शार्ङ्गरवः**— समजला महाराज निरोप.

**काश्यपः**— मुली, तुला आतां थोडा उपदेश करावयाचा आहे. आम्ही जरी वनांत राहतों तरी लौकिकांतल्या गोष्टी आम्हांला समजतात.

**शार्ङ्गरवः**— महाराज, पंडितांना समजत नाहीं अशी गोष्टच नाहीं.

**काश्यपः**— बाळे, तूं सासरीं गेल्यावर अशी वाग—

पद– रागिणी भैरवी, ताल दीपचंदी.

*** वाडवडिलां सेवित जावें ॥ सवतीशीं प्रेम धरावें ॥**
**पतिकोपीं नम्र असावें ॥ सेवकांवरि सदय पहावें ॥**
**निजधर्मी दक्ष रहावें ॥ भाग्य येतां मत्त न व्हावें ॥**
**ऐशीलाची गृहिणी ह्मणती ॥ इतरा कुलव्याधिच होती ॥**

यावर गौतमीचें काय म्हणणें आहे ?

**गौतमीः**— नवऱ्यामुलीला हाच उपदेश योग्य. मुली हें सारें ध्यानांत ठेव बरें.

**काश्यपः**— मुली आतां एकदां मला आणि आपल्या सख्यांना आलिंगन दे.

**शकुंतलाः**—बाबा, अनसूया आणि प्रियंवदा येथूनच का परतायच्या ?

**काश्यपः**— वत्से, यांचींही लग्नें व्हावयाचीं आहेत. यांना तिकडे येतां येत नाहीं; तुझ्याबरोबर गौतमी येईल.

**शकुंतलाः**— ( बापाच्या गळ्यास मिठी मारून ) बाबाः—

‡पद—राग आनंदभैरवी, ताल दीपचंदी.

काय परम रमणीय सखीचें, या चालीवर.

**दूर मि झालें या अंकाच्या सुखदपदा त्यजुनी ॥ जेंवि पडे. चंदनवल्ली ती मलयगिरीवरुनी ॥ राहुं कशी मी दूर तुह्मांला सोडुनि विरहानलिं जावोनी ॥ १ ॥**

---

साध्य नसे मुनिकन्या; या चालीवर.

***वडिलां देवचि मानीं ॥ गे तत्पद सेवावं भक्ति करोनी ॥ वडि० ॥ ध्रु० ॥ सवतिजनासी प्रेम धरावें ॥ रुष्ट पती जरि नम्रचि व्हावें ॥ जे तव सेवक असती ॥ त्यां अवलोकीं सकरुणनयनीं ॥ १ ॥ निजधर्मी तूं दक्ष रहावें ॥ भाग्योदयीं काधें मत्त नसावें ॥ त्या सुगृहिणी ह्मणती ॥ गे अन्या त्या स्वकुला हानी ॥ वडिलां० ॥ २ ॥**

‡ मलयाचलावरून उपटून टाकलेल्या चंदनलतेप्रमाणें तुमच्या मांडीवरून मी दूर झालें ! आतां हा विरह सोसून देशांतरीं कशी जिवंत राहीन बाबा !



**कण्वः–** "ज्याची मी इच्छा करतों तें तुला प्राप्त होवो !" [ शाकुंतल अंक ४ पृष्ठ ६५

**काश्यपः**— मुली, अशी भितेस काय ?

पद–रागिणी भैरवी, ताल त्रिताल.

*** या विरहा कां भीसी ॥ राहुनि पतिगृहीं अनुदिन वैभव कार्यसमाकुल होसी ॥ या विरहा ॥ ध्रु० ॥ पाउनि पावन पूरुपरी सुत पूर्व दिशा रवि जैसी ॥ दीन वनीं वसणार मुनीची अठवण येईल कैसी ॥ १ ॥**

**शकुंतलाः**— ( बापाच्या पायां पडते. )

**काश्यपः**— ( वर हात करून) ज्याची मी इच्छा करतों, तें तुला प्राप्त होवो.

**शकुंतलाः**— ( सख्यांजवळ येऊन ) गड्यांनों ! तुम्ही दोघीही मला एकदम आलिंगन द्या.( सख्या तसें करितात. )

**प्रियंवदाः**— गडे, जर कदाचित् त्या राजानें तुला ओळखलें नाहीं, तर ही त्याच्या नांवाची आंगठी तुझ्या हातांत आहेच, ती त्याला दाखीव म्हणजे झालें.

**शकुंतलाः**— तुमच्या या संशयानें मला बाई फार भीति वाटते.

**प्रियंवदाः**— अग, भिऊं नको, अत्यंत स्नेह असला म्हणजे असें मनांत वाईट येतें.

**शार्ङ्गरवः**— दिवस बराच वर आला. ताई आटप लवकर आतां.

**शकुंतलाः**— ( आश्रमाकडे तोंड करून ) बाबा, पुनः हें तपोवन मला कधीं पाहायला मिळेल ?

---

* मम जिवाची प्रियकरणी, या चालीवर.

**या वियोगा कां भीसी ॥ ध्रु० ॥ पतिसदनांतिल मोठ्या मोठ्या मंगलकार्यीं गुंतुन जासी ॥वियो० ॥ १ ॥**
**पूर्व दिशेला रवि तैसा सुत पूरुचि दुसरा जेव्हां बघसी ॥ वियोगा० ॥ २ ॥**
**वनवासी या दीन मुनीची तुज मग अठवण होइल कैसी ॥ वियो० ॥ ३ ॥**

**काश्यपः**— ऐक,—

**पद—**राग असावरी, ताल त्रिताल.

: **बाई तूं येसी वनिं या ॥ भोगुनि सुखवैभव राज्याचें श...**
**अशा आश्रमीं पतिसह मग ॥ ध्रु० ॥**
**होउनियां चिरकाल सपत्नी सागरांत महिकांतेची ॥ दुष्यंता-**
**पासूनि तुला जो होइल सुत त्यासी ॥**
**सिंहासनिं अभिषेचुनि त्यावरि सर्व कुटुंबाचा भर ठेवुनि ॥**
**बाई० ॥ १ ॥**

**गौतमीः**— मुली, उशीर होतो. आतां बाबांना मागें जायला सांग. ( काश्यपाला ) अथवा ही अशीच बोलत राहणार. आपणच मागें फिरा, म्हणजे झालें.

**काश्यपः**— मुली, तपोनुष्ठानाला व्यत्यय येतो.

**शाकुंतलाः**— ( पुनः बापाच्या गळ्यास मिठी मारून ) बाबा:—

**अंजनीगीत—**राग जोगी, ताल धुमाळी.

**तनु ही सुकली अधिंच तपानें ॥ पांडुरताही आलि तयानें ॥**
**त्यांतुनही माझ्या चिंतेनें ॥ कष्टि नका होऊं ॥ १ ॥**

---

तुझा तनय जो इंद्र, या चालीवर.

* **राज्यसुखाचा यथेष्ट अनुभव घेउनियां निशिदिनीं ॥ मनांतिल हेतु सकल सारुनी ॥ समुद्रवसना वसुंधरा युवतिची सवत होउनी ॥ बहुवत्सरें प्रजा सुखवुनि** ॥ चाल ॥ **अप्रातिरथसुत जो होय तयालागुनि ॥ त्या सार्वभौमसिंहासनिं अभिषेचुनी ॥ निज कुटुंबपोषणभर त्यावरि ठेवुनि** ॥ चाल ॥ **पतिसह मग तूं येशिल पुनरपि शांत अशा या वनीं ॥ धरिं हा निश्चय अपुल्या मनीं ॥ १ ॥**

१ आधींच तपश्चर्येनें तुमचें शरीर कृश झालें आहे, त्यांत आतां माझ्या करितां अधिक दुःख करून घेऊं नका. ( पद देवल कृत )

**काश्यपः**— ( सुस्कारा टाकून )

**पद**—रागिणी भैरवी, ताल दादरा.

***जाईल कैसा तनये शोक मनाचा ॥**
**गुणगण तुझा ठसला विसरत कैचा ॥ ध्रु० ॥**
**पहात असतां उटजद्वारीं ॥**
**केला बागचि नीवाराचा ॥ जाईल० ॥ १ ॥**

जा, तुझे मार्ग तुला सुखदायक होवोत.

( शकुंतला, शिष्य व गौतमी जातात. )

**प्रियंवदाः**— ( पाहून ) हाय हाय ! गेली शकुंतला ! झाडांच्या आड दिसेनाशी झाली ! !

**काश्यपः**— ( सुस्कारा टाकून ) अनसूये, तुमच्या धर्माचरणाची सखी निघून गेली ! तर शोकाचा निग्रह करून पर्णकुटिकेकडे चला माझ्याबरोबर.

**प्रियंवदाः**— बाबा, शकुंतलेवांचून हें तपोवन कसें उदास दिसतें हो ! तेथें जावें तरी कसें ?

**काश्यपः**— स्नेहामुळें असे विकार होतात (हळुहळू चालून) अहाहा ! शकुंतलेला सासरीं पाठवून मी आज निश्चिंत झालों. कारण—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**(परक्याचें धन कन्या तें त्या देउनि आज मि सुटलों ॥)**
**ठेव जशी मालकासि अर्पुनि आज ऋणांतुनि फिटलों ॥**
**मुलिंनो या आतां ॥ गेली लाडकि मम दुहिता ॥ १ ॥**

( सर्व निघून जातात. )

**( चवथा अंक समाप्त )**

---

पांडुनृपति जनक जया, या चालीवर.

*** विसराया सुगुण असे । कठिण हृदय करूं कसें ॥**
**जोंवरि ही तनु असे । शोक तोंवरी ॥ १ ॥**
**अंगणिं नीवारवली । पडुनि तृणें जीं उगवलीं ॥**
**वृक्षवेल तुझ्या मुली । रडवितील कीं ॥ २ ॥**

# अंक ५ वा.

( आसनस्थ राजा व विदूषक प्रवेश करतात. )

**विदूषकः**— ( कान देऊन ) अरे मित्रा, संगीतशाळेकडे जरा कान दे. पहा चीज कशी मजेदार असून तिच्यांत स्वर कसे गोड भरून सोडले आहेत. मला वाटतें हंसपादिकाराणीची गाण्याची तालीम चालली आहे.

( पडद्यांत ) **पद**—राग ब्याहाग, ताल दादरा.

**अभिनवमधुलोलुप हे मधुकरा अशी ॥ भुक्तवस्तुविस्मृति तव जाहली कशी ॥ रसभरिता आम्रकली । लुब्धपणें चाखियली ॥ मिळतां मग कमलावली । तेथें तव मति गुंगली ॥ तव विरहें झुरणारिस पाडलिस फशीं ॥ अभि०॥"**

**राजाः**— वाहवारे वाहवा ! या गीतांत राग कसा भरून गेला आहे !

**विदूषकः**— काय या गीतांतील अर्थसंबंध तुला समजून आला ?

**राजाः**— ( हंसून ) तिचा माझा एकवारच भेटीचा योग आला असून इतकी ही आमची शोभा होण्यास राणी वसुमतीच कारण होय. असो, सख्या माधव्या, तूं स्वतः जाऊन हंसपादिकेला सांग कीं आमची फजिती करण्यास ही चांगली युक्ति काढली.

**विदूषकः**— आज्ञेप्रमाणें करतों. ( उठून ) भले महाराज, मी तेथें जावें आणि तिनें मला दुसऱ्याकडून शेंडी धरून यथेष्ट पाद्यपूजन करावें, म्हणजे अप्सरेपासून जसा संन्याशाला मोक्ष मिळायचा नाहीं, तद्वतच आमची अवस्था होणार तर.

**राजाः**— अरे जा; अंमळ प्रौढपणानें तिला माझा निरोप कळीव म्हणजे झालें.

**किदूषकः**— काय माझें नशीब तरी. [ जातो. ]

राजा:— [ आपल्याशीं ] काय बरें असेल हें ? या गीताचा अर्थ ऐकल्यापासून मला माझ्या कोणत्याही प्रिय मनुष्याचा वियोग झाला नसूनही मी इतका उत्कंठित झालों ! अथवा,—

**साकी.**

राग जोगी, ताल धुमाळी.

**सुंदर वस्तू पाहुनि ऐकुनि अति रमणीया वाणी ॥**
**उत्सुक होतो मनुज तयाला कारण नाहीं कोणी ॥**
**स्मृति जननांतरिंची । होते न कळत मनिं साची ॥**

[ पर्याकुल होऊन बसतो. नंतर कंचुकी प्रवेश करितो. ]

**कंचुकी:**— काय हो माझी अवस्था तरी ही—

**अंजनीगीत.**

राग झिंजोटी, ताल धुमाळी.

**अंतःपुरिं या हिंडायातें । चिन्ह म्हणुनि घे या यष्टीतें ॥**
**वृद्धपणीं मज टेकायातें । साह्य तीच झाली ॥**

पहा, महाराजांच्या धर्मकृत्यास आड येणें बरोबर नाहीं, हें खरें, तथापि आमचे महाराज धर्मासनावरून नुक्तेच उठले असून विश्रांति-सुख घेत आहेत, त्यांस कण्वशिष्य आले आहेत हें सांगून, त्यांच्या सुखाचा बिघाड माझ्यानें करवत नाहीं; अथवा लोककल्याणाचा अधि-कार ज्यांकडे आहे त्यांना विसावा कोठचा ?

राग अलैया बिलावल, ताल दादरा.

कामदावृत्ताच्या चालीवर.

**एकवार जो जोडिला असे । भानुरथ नभीं नित्य फिरतसे ॥**
**नाहिं वायुची खुंटली गती । निशिदिनीं पहा सतत वाहती ॥**
**शेष जो धरी भूमिभर शिरीं । राखिला तयें तोचि अजवरी ॥**
**नृपतिची कथा तेंवि ही असे । शांतिसौख्य तें त्या कधीं नसे ॥**

तर आतां आपलें काम करावें. ( फिरून पाहून) हे आमचे महाराज—

**साकी.**

राग जोगी, ताल धुमाळी.

**प्रजा सर्व त्या निजपुत्रापरि सुखवुनि घेई शांति ॥**
**द्विपेंद्र जैसा निज कळपांतिल चारुनि सर्वहि दंति ॥**
**घेतो विश्रांति ॥ तरुच्या शीतल छायांतीं ॥**

( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो. ( मुजरा करून ) सरकार, हिमाचलाच्या पायथ्याशीं रहाणारे कांहीं ऋषी कण्वमहर्षींचा निरोप घेऊन आले आहेत व त्यांच्या बरोबर दोन स्त्रियाही आहेत. यावर महाराजांची आज्ञा होईल त्याप्रमाणें.

**राजाः**— ( आदरानें ) काय ? कण्वमहामुनींचा निरोप घेऊन आले आहेत म्हणतोस ?

**कंचुकीः**— होय महाराज.

**राजाः**— तर मग आमचे पुरोहित सोमरातभट्ट यांना सांग कीं, त्या ऋषींची विधियुक्त पूजा करून तुम्हींच मजजवळ त्यांस घेऊन यावें. मीही ऋषिजनांचें दर्शन घेण्याच्या ठिकाणीं वाट पहात रहातों.

**कंचुकीः**— जशी महाराजांची आज्ञा.

( मुजरा करून निघून जातो. )

**राजाः**— ( उठून ) वेत्रवती होमशाळेकडे चल.

**वेत्रवतीः**— असें इकडून यावें महाराज.

**राजाः**— ( राज्याधिकाराविषयीं खेद दर्शवून ) सर्व मनुष्यांना इच्छित वस्तु मिळाली म्हणजे सुख होतें; पण राजेलोकांना तसें न होतां उत्त-रोत्तर दुःखच होत जातें:—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**प्रतिष्ठेनें औत्सुक्य शांत होतें ॥**
**लब्धपरिपालन फार दुःख देतें ॥**

**राज्य हें नच सुखद कीं श्रमाचें ॥**
**छत्र जैसें निज करीं धारकाचें ॥**

( पडद्यांत दोन बंदीजन पुकारतात. )

**पहिला:—** महाराजांचा विजय असो.

**चूर्णिका—**राग आनंदभैरवी.

**निजसुखासि विमुख होऊनि इतर जनाभीष्ट पूर्ण करूनि तुष्टि द्याया स्वतनुलागिं कष्ट देशी ॥ अथवा तव धर्म हाचि तदुचित कर्म करिशि चंडकिरणोद्दंडताप निज शिरिं पावुनि स्वच्छायाश्रितांसि सौख्यदायि तरुवर जैसा ॥**

**दुसरा:—** जयजयकार महाराज !

**चूर्णिका—**राग सदर.

**उन्मार्गगामियांसि दंड करुनि सन्मार्गी लाविशि प्रजा-जनकलह विवेचुनि करिशि लोकरक्षणा ॥ विपुलसंपत्ति पालकासि बहुतात होति परि दीनानाथ जनांसि आप्त तूंचि रे तूंची ॥**

**राजा:—** या स्तुतिपाठकांनीं माझ्या खिन्न झालेल्या मनास पुनः हुषारी आणिली. ( इकडे तिकडे हिंडतो. )

**प्रतिहारी:—** महाराज, स्वच्छ सारवून सुशोभित केलेला हा होम-शाळेपुढील ओटा यावर महाराजांनीं चढावें. जवळ ही होमधेनुही आहे.

**राजा:—** ( चढून वेत्रवतीच्या खांद्यावर हात टाकून उभा राहतो. ) वेत्र-वतिके, भगवान् काश्यपऋषींनीं मजकडे आपले शिष्य कशाकरितां बरें पाठविले असतील ?

**पद—**लहान वस्तु ती स्थूल दिसली—या चालीवर.
रा० हम्मीर, ताल धुमाळी.

**मुनिच्या तपा विघ्न केलें ॥ किंवा त्यांना कुणिं छळिलें कीं तत्कर्मा दूषियलें ॥ अथवा मत्पापें औषधिगण वांझ**

**सर्व झाले ॥ कळेना ऋषि कां अजि आले ॥ ऐसें नाना**
**तर्कें व्याकुल मन्मन हें भ्यालें ॥ कळेना० ॥**

**प्रतिहारीः**— महाराजांच्या निर्मळ आचरणामुळें प्रसन्न होऊन महाराजांची तारीफ करण्याकरितांच ते आले असावेत, असें मला वाटतें.
( तदनंतर गौतमीसहवर्तमान शकुंतलेस पुढें करून ऋषि व त्यांच्यापुढें कंचुकी व पुरोहित प्रवेश करितात. )

**कंचुकीः**— महाराज, असें इकडून यावें.

**शार्ङ्गरवः— शारद्वताः**—

**साकी.**

राग जोगी, ताल धुमाळी.

**महाभाग हा संपत्तीतें जोडी नय नच सोडी ॥**
**लोक सर्व ते नीतिमान परि मज एकांतीं गोडी ॥**
**ह्मणुनि मज वाटे ॥ हें गृह सर्वही कां पेटे ॥**

**शारद्वतः**— खरोखर मोठ्या नगरांत तूं कधींच आला नाहींस म्हणूनच तुला असें वाटतें. पहा —

**पद**—राग शंकराभरण, ताल धुमाळी.

( अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली—या चालीवर )

**शार्ङ्गरवा मित्रा हे सारे जन दिसती मजला ॥**
**सर्वकाल जे आदर करुनि सेविति विषयाला ॥ ध्रु० ॥**
**स्नात जनाला अस्नातचि कीं अशुची शुद्धाला ॥**
**स्वच्छंदाला बद्ध जसा कीं सुप्त जागृताला ॥**
**धनलोभी ते जोविं दिसावे महाविरक्ताला ॥ १ ॥**

**शकुंतलाः**— [ दुश्चिन्ह झालें असें सुचवून ] अगबाई, माझा उजवा डोळा कां लवतो ?

**गौतमीः**— मुली, इडापिडा टळो आणि तुझ्या नवऱ्याच्या घरच्या कुलदेवता तुझें कल्याण करोत ! ( चालूं लागतात. )

**पुरोहितः**— अहो तपस्वीजन हो, चारी वर्णांच्या धर्मांचें प्रतिपालन करणारा हा आमचा राजा तुह्मी आलां हें ऐकतांच आपल्या आसनावरून उठून या ठिकाणीं तुमची वाट पहात उभा आहे.

**शार्ङ्गरवः**— अहो राजोपाध्येबोवा, ही गोष्ट फार वाखाणण्याजोगी आहे खरी, तथापि आम्हांला याचें फारसें नवल वाटत नाहीं. कां म्हणाल तर—

**पद**—राग भीमपलासी, ताल धुमाळी.

सखया रामा विश्रांति तुझिये नामीं—या चालीवर.

**नम्र होती फलभारें तरुवर सारे ॥**
**लउनि येती मेघही ते नवजलभारें ॥**
**उदयिं साधू लीनचि ते निजाचारें ॥**
**सज्जनांची ऐशि ही रीति बा रे ॥**

**प्रतिहारीः**—महाराज, हे ऋषिजन प्रसन्नमुख दिसतात, यावरून त्यांचीं धर्मकृत्यें यथास्थित चाललीं आहेत असें वाटतें.

**राजाः**— ( शकुंतलेकडे पाहून ) अरे, ही कोण ?

**पद**—राग झिंजोटी, ताल दादरा.
लोपविली बहुत शोभा—या चालीवर

**वस्त्रानें देह सारा सुंदरिनें झांकिला ॥**
**लावण्याकृति हीची न दिसे कीं स्फुट मला ॥**
**ऋषिवर्गी केविं आली सुंदरि ही कोमला ॥**
**शोभे ही शुष्कपर्णी पल्लववान्निर्मला ॥ वस्त्रानें० ॥**

**प्रतिहारीः**— महाराज, मलाही मोठें आश्चर्य वाटतें; पण तर्क चालत नाहीं. तथापि हिच्या देहाची आकृति फारच सुंदर असावी यांत संशय नाहीं.

**राजाः**— असो, दुसऱ्याच्या स्त्रीविषयीं इतकी बारीक चौकशी उपयोगी नाहीं.

**शाकुंतला:**— ( उरास हात लावून ) हे हृदया, इतकें कांपूं नकोस; या राजाच्या भाषणाचा अभिप्राय कळेपर्यंत धीर धर.

**पुरोहित:**— ( पुढें होऊन ) राजा, या ऋषींची विधियुक्त पूजा केली आहे. हे कण्वमहामुनीकडून कांहीं निरोप घेऊन आले आहेत. तो स्वत: ऐकून घ्यावा.

**राजा:**— मी ऐकण्यास तयार आहें.

**ऋषि:**— ( वर हात करून ) राजा तुझा विजय असो !

**राजा:**— मी तुम्हां सर्वांस नमस्कार करतों.

**ऋषि:**— तुला ज्याची इच्छा असेल तें मिळो !

**राजा:**— तुमच्या सर्व क्रिया निर्विघ्न चालल्या आहेतना ?

**ऋषि:**—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**धर्मकृत्या विघ्न तें ये कुठोनी ॥**
**साधुपालनिं दक्ष तूं नृप असोनी ॥**
**चंडभानू राहतां नभोभागीं ॥**
**काय दिसतो काळोख दृष्टिलागीं ॥**

**राजा:**— तर मग राजा हें नांव मला शोभतें. बरें सर्व लोकांवर अनुग्रह करणारे तुमचे गुरु कण्वमहामुनि कुशल आहेत ना ?

**शार्ङ्गरव:**— महासिद्धपुरुषांच्या स्वाधीनच त्यांचें कुशल असतें; त्यांनीं आपलें कुशल विचारून नंतर आपल्याला असें कळवावें म्हणून सांगितलें आहे.

**राजा:**— काय त्यांची आज्ञा आहे ?

**शार्ङ्गरव:**— एकमेकांची प्रीति जडल्यामुळें माझ्यामागें तुम्ही माझ्या मुलीचा स्वीकार केलात ही गोष्ट प्रीतिपूर्वक मला मानवली. कारण—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**श्रेष्ठांमाजीं अग्रेसर तूं तैशी ही तव भार्या ॥**
**शकुंतला सत्क्रिया मूर्तिमति युवतिवर्गि ही आर्या ।**
**होता संगम हा ॥ मिळवी विधि तो सुयश महा ॥**

तर आतां ही तुमची प्रिय पत्नी तुमच्याकडे पाठविली आहे. हिच्यासह धर्माचरण करावें. आणि ही गर्भवती आहे, हिचें यथायोग्य रक्षण करावें अशी त्यांची आज्ञा आहे.

**गौतमीः**— राजा, मला कांहीं बोलावेंसें वाटतें; परंतु बोलण्याला कांहीं जागा नाहीं. कां कीं, तुह्मी उभयतांनीं परस्पर प्रीति करतांना गुरुजनांची अपेक्षा धरली नाहीं, आणि बंधुजनांसही विचारलें नाहीं. तुम्ही स्वतः होऊन एकमेकांवर प्रीति केली आहे, आणखी प्रीति करा हें मीं काय सांगावें ?

**शकुंतलाः**— ( आपल्याशीं ) यावर प्राणनाथ काय भाषण करतात पहावें.

**राजाः**— काय हें माझ्यावर तुफान !

**शकुंतलाः**–(आपल्याशीं) हें कांहीं भाषण नव्हे, अग्नीचाच वर्षाव आहे !

**शार्ङ्गरवः**— राजन्, आपण लोकरीतीमध्यें निष्णात असून हें काय भाषण करतां ?

**साकी**–राग जोगी, ताल धुमाळी.

**विवाहिता स्त्री सती असोनी जरि माहेरीं राहे ॥**
**दूषण तिजला लोक देति ते म्हणुनी जवळी घ्या हे ॥**
**होवो आवडती ॥ अथवा तुह्मां नावडती ॥**

**राजाः**— काय ? या स्त्रियेबरोबर पूर्वीं मीं लग्न केलें आहे म्हणतां ?

**शकुंतलाः**— ( विषाद पावून आपल्याशीं ) मना, मघां तुला जी शंका आली तिचा प्रत्यय आत्तां आला.

**शाङ्गरवः**—

आर्या.

**कां कृतकार्यद्वेषें धर्माप्रति विमुख होसि भूपाला ॥**

**राजाः**— भलतीच कल्पना मनांत आणून माझ्याविषयीं हा प्रश्न योग्य नाहीं.

**शाङ्गरवः**—

**मूर्च्छविती बहुधा हे विकार संपत्तिनें मदांधाला ॥**

**राजाः**— येणें करून फारच मी निंदास्पद झालों.

**गौतमीः**— मुली, घटकाभर लाज सोड. तुझ्या अंगावरला हा बुरखा मी काढतें म्हणजे तुझा पति तुला ओळखील.

( बुरखा काढते. )

**राजाः**— ( शकुंतलेकडे निरखून पाहून आपल्याशीं. )

**पद**—राग कालंगडा, ताल धुमाळी.

**किति सुंदर तरि रूप असे हें न्यून जयामधिं किमपि**
**नसे ॥ निर्मल कांती दावुनि माझ्या हृदयातें हें भुलवि-**
**तसे॥ पूर्वी हिजसीं लग्न लाविलें ऐसें मजला हे म्हणती ॥**
**आठवितों परि थांग न लागे वरचेवर ये भ्रम चित्तीं ॥**
**कुंदकुसुमिं दंवकण पाहुनियां कुंठित होतो भ्रमर जसा ॥**
**घ्याया अथवा सोडाया हिस धीर न होई मजहि तसा ॥**

( विचार करीत स्तब्ध राहतो. )

**प्रतिहारीः**— आमच्या सरकारचा केवढा तरी धार्मिकपणा हा ! असें स्त्रीरत्न अनायासानें मिळालें असतां तें घ्यावें किंवा न घ्यावें असा विचार करणारा कोण पुरुष आहे ?

**शाङ्गरवः**— राजा, असें मौन धारण करून कां बसलास ?

**राजाः**— अहो मुनिवर्य, मीं पुष्कळ स्मरण करून पाहिलें, तथापि हिचा मीं स्वीकार केल्याचें मला कांहीं आठवत नाहीं. तशांत ही गरोदर



शार्ङ्गरवः- " कृत कार्यद्वेषे धर्माप्रति विमुख होसि भूपाला ! " [ शाकुंतल अंक ५ पृष्ठ. ७६

आहे असें हिच्या चिन्हांवरून स्पष्ट दिसतें. मग तो गर्भ माझ्यापासूनच असेल असें मानून हिचा स्वीकार मीं कसा करावा बरें ?

**शकुंतलाः**– ( अपल्याशीं ) लग्न झालें किंवा नाहीं याचीच यांना शंका आहे; मग आतां माझ्या मोठ्या आशा सफल होतील याची भ्रांतिच नको.

**शार्ङ्गरवः**—असो, आतां तें राहूं द्या. यावरून असें झालें तर—

**पद**—राग काफी, ताल धुमाळी.

गावीं संतचरित्रें हो। तारक परम पवित्रें हो ॥ या चालीवर.

**वाहवा थोर तूं भूपाला ॥ खासें ठकविलेंस ऋषिला ॥**
**॥ ध्रु० ॥ गुप्त कर्म तूं केलें त्यातें मान्य मुनी जो झाला॥**
**सांप्रत ऐशा निंद्य भाषणीं तो तूं झिडकारीला ॥ कण्व-**
**गुरूची तुजसीं रीति पाहुनि वाटे मजला ॥ आदर**
**करुनी जैसें द्यावें निजधन तें चोराला ॥**

**शारद्वतः**—शार्ङ्गरवा, व्यर्थ बोलून फळ काय ? बोललास इतकें पुरे आहे. शकुंतले, जें बोलायचें तें आम्ही बोललों. हा राजा तर असें म्हणतो, तर आतां त्याला खूण पटवून त्याची खातरी होण्याजोगें जें बोलावयाचें असेल तें तूंच बोललें पाहिजे.

**शकुंतलाः**— ( एकीकडे तोंड करून ) अगबाई, तशा प्रकारच्या प्रीतीचा शेवट असा झाला ! तर आठवण करून फळ काय ? आतां मीं जन्मभर दुःख करीत बसावें हें ठरलें. ( उघड ) प्राणना– ( इतकें अर्धेंच बोलून ) लग्नाविषयींच संशय आल्यावर असें हांक मारणें चांगलें नव्हे. पौरवराज, पूर्वी आश्रमांत येऊन स्वभावतः उघड मनाच्या मनुष्याला तशा गोड गोड भाषणांनीं फसवून आतां हें असलें विपरीत भाषण करणें तुम्हांला योग्य नाहीं.

**राजाः**— ( कानांवर हात ठेवून ) शिव, शिव ! काय बोलतेस हें !

**साकी—राग जोगी, ताल धुमाळी.**

**मळवुनि धर्मा या मनुजातें नरकीं पाडायासी ॥**
**स्वच्छोदकसह तट तरू ते नदी वर्षाकालिं जैसी ॥**
**ऐसें कां वदसी ॥ भीति मनीं नच वागविसी ॥**

**शाकुंतलाः**— बरें, तर आपणास खरेंच स्मरण नसून परस्त्रीचा स्वीकार आपण कसा करावा या शंकेनें आपण इतका वेळ असें भाषण केलें असेल, तर आतां खुणेची आंगठी दाखवून आपली शंका दूर करतें.

**राजाः**— ही तोड फार चांगली आहे.

**शकुंतलाः**— ( आंगठीच्या जागीं आंगठी नाहीं हें पाहून ) हाय हाय ! माझ्या बोटांतली आंगठी कोठें पडली ?

**गौतमीः**— बहुतकरून शक्रावतार क्षेत्रांतील शचीतीर्थाचें वंदन करायला तूं गेली होतीस, तेथें तुझ्या बोटांतून आंगठी गळून पडली यांत संशय नाहीं.

**राजाः**— ( हंसून ) स्त्रियांचें प्रबल चरित्र असतें म्हणून म्हणतात त्याचा मासला हाच पहा.

**शकुंतलाः**— येथें दैवानें आपली करामत चांगली दाखविली. असो, दुसरी खुणेची गोष्ट सांगतें ती ऐका.

**राजाः**— इतका वेळ पहावयाचें होतें तें आतां ऐकायचें झालेंना ? बरें, बोला बोला काय तें.

**शकुंतलाः**— एके दिवशीं आम्ही उभयतां नवमालिकामंडपांत बसलों असतां उदकानें भरलेला कमलपत्राचा द्रोण तुमच्या हातांत होता. ऐकलें,—

**राजाः**— माझें लक्ष आहे, पुढें चालूं द्या.

**शकुंतलाः**— इतक्यांत मीं पुत्राप्रमाणें बाळगलेला दीर्घापांग नांवाचा बाळमृग तेथें जवळ आला; तेव्हां हाच का प्रथम पीईना, असें म्हणून

तो द्रोण दयेनें आपण त्याच्या पुढें केला; परंतु परिचय नसल्यामुळें तो तें पाणी प्याला नाहीं; मग तोच द्रोण मीं आपल्या हातीं घेतला, तेव्हां त्यानें निर्भयपणें जलपान केलें; तेव्हां आपण हास्य करून चेष्टेनें भाषण केलें कीं, सजातीयांवर सर्वांचा विश्वास असतो; तुम्ही दोघेंही अरण्यक खरीं. हें कांहीं स्मरतें का ?

**राजा:**— अशा प्रकारच्या स्वकार्यसाधक, कपटी, मधुर भाषणांनीं विषयी पुरुष वश होतात, मी त्यांतला नव्हें.

**गौतमी:**— हे महाभाग राजा, असें नकोरे बोलूं, अरे जन्मापासून ही तपोवनांत वाढली असल्यामुळें कपट म्हणजे काय हें हिच्या गांवीं देखील नाहीं.

**राजा:**— अहो वृद्ध तापसी बाई, स्त्रीजातीला हें शिकवायला नको

**दिंडी**— राग लीलांबरी, ताल दादरा.

**शिक्षणाविण कुशलता अशा कामीं ॥**
**पशूपक्ष्यांतहि दिसत बहुत नामी ॥**
**अन्यहस्तें कोकिला निज पिलांतें ॥**
**पोसवी मग शिकविणें काय हीतें ॥**

**शकुंतला:**— ( रागानें ) अरे नीचा, आपल्या स्वभावाप्रमाणें दुसऱ्याची परीक्षा करतोस? अरे धार्मिकपणाचें ढोंग दाखवून गवतानें तोंड झांकलेल्या विहिरीप्रमाणें भयंकर तुझ्यासारखा कोण पुरुष असेल या जगामध्यें ?

**राजा:**— ( आपल्याशीं ) माझ्या बुद्धीला संदेह उत्पन्न करणारा हिचा कोप खरा दिसतो, यांत कपट भासत नाहीं. पहा:—

**पद**— राग भीमपलाशी ताल धुमाळी.

**लाल झाली कोपानें चढवी भिवया कैशा भलतीकडे ॥**
**वाटे मजला कंदर्पाचें धनु मोडुनि झाले तुकडे ॥ ध्रु० ॥**

**एकांतांतिल वृत्त ह्मणोनी सुंदरिनें जें सांगितलें ॥**
**मजला त्याचा प्रत्यय नाहीं ह्मणुनि म्यां नच आदरिलें॥**
**वज्राहुनि अति कठिण मनाचा असें तिनें मज ठरवियलें॥**
**रक्त नयन हीचे कीं माझ्या हृदयनगाचे भेदि कडे ॥ लाल० ॥**

( उघड ) बाई, या दुष्यंताची वर्तणूक सर्वांस महशूर आहे; तूं म्हणतेस तसें अद्यापि कोणाच्याच अनुभवाला आलें नाहीं.

**शकुंतला**:— फार चांगलें केलेंत ! हाय हाय ! देवा मी या पुरुवंशाच्या नांवावर फसून, ज्याच्या पोटांत विष व तोंडांत मात्र मध अशा पुरुषाच्या नादीं लागून परिणामीं स्वच्छंदचारिणी झालेंना !

( तोंड झांकून रडूं लागते. )

**शार्ङ्गरव**:— पाहिलेंस हें, आपल्या वडिलधाऱ्या माणसांना न पुसतां आपल्या मनानें असा नाचरेपणा केला म्हणजे त्याचा परिणाम हा असा व्हायचाच. एखाद्याच्या मनाची परीक्षा न करतां त्याच्याशीं स्नेह केला म्हणजे पुढें तोच उलटा वैरी होतो, वैरी.

**राजा**:— अहो महाराज, आपण हिच्याच बोलण्यावर अगदीं विश्वास ठेवून आम्हांला इतका दोष देतां हा न्याय नव्हे.

**शार्ङ्गरव**:— ( त्याचा तिरस्कार केल्यासारखें दाखवून लोकांकडे तोंड करून ) अहो, सभाजनहो, या राजेसाहेबांच्या तोंडांतून कशीं मुक्ताफळें पडत आहेत तीं ऐका,—

चामरावृत्ताच्या चालीवर.

राग गौरी, ताल दादरा.

**जीस कपट ठाउकें नसे कधींच अंतरीं ॥**
**मान ह्मणति भूप हे असत्य तीचि वैखरी ॥**
**फसविणें परांसि जें शास्त्र ह्मणुनि शीकती ॥**
**सत्यवादि तेचि जगीं आज होऊं पाहती ॥**

**राजा:**— अहो खऱ्याचे भक्त, आपण म्हणतां माझें बोलणें असत्य, तसेंच कां घटकाभर होईना; पण या बिचारीला फसवून मला कोणता लाभ ?

**शार्ङ्गरव:**— कोणता हें ठाऊक नाहीं काय ? अधःपात ! !

**राजा:**— पुरुवंशांतील राजांनीं अधःपाताची इच्छा धरिली असें कधीं कोणीं ऐकलें नाहीं.

**शारद्वत:**— शार्ङ्गरवा, उगीच उत्तरावर प्रत्युत्तर देऊन फळ काय ? गुरुजींच्या आज्ञेवरून आम्हीं आमचें काम केलें; तर आतां आपण आपल्या आश्रमास जाऊं. ( राजास ) अरे राजा,—

**साकी**—राग जोगी; ताल धुमाळी.

**कांता तव ही लग्नाची गृहिं घेई अथवा टाकीं ॥**
**सर्व प्रकारें स्त्रीवर पतिची सत्ता ती अवलोकीं ॥**
**या स्त्रीवस्तूचा ॥ मालक तूंचि तूंचि साचा ॥**

गौतमी, चल, चालूं लाग. ( असें म्हणून चालूं लागतात. )

**शकुंतला:**— या कपट्यानें तर माझा गळा कापला, आणि तुम्हीं देखील मला मंदभागिनीला येथेंच सोडून कसे चाललां ?

( असें म्हणून त्यांच्या मागें जाऊं लागते. )

**गौतमी:**— बाळा शार्ङ्गरवा, ही पहा कशी दीनासारखी रडत रडत आपल्या मागें येत आहे. या दगडासारख्या कठिण हृदयाच्या नवऱ्याला दयाच येत नाहीं; मग माझ्या पोरीनें आतां कोणाच्या तोंडाकडे पहावें.

**शार्ङ्गरव:**— ( रागानें मागें पाहून ) कांग ए दांडगे पोरी, तूं स्वतंत्र होऊं पहातेस काय ?

( शकुंतला भयानें लटपट कांपूं लागते. )

**शार्ङ्गरवः**— शकुंतले,—

**पद**— राग मांड झिंजोटी–ताल दादरा.

**भूप ह्मणतो हा तेविं तुझें कृत्य जरी गे ॥**
**काय येउनि तूं सौख्य होय गुरुस घरीं गे ॥**
**जरी आचरणें असशी शुद्ध सती खरी गे ॥**
**वसुनि पतिच्या गृहीं नित्य नित्य दास्य करीं गे ॥**

तर मग रहा अशी येथेंच, आम्ही जातों.

**राजाः**— अहो ऋषिवर्य, या बाईला उगाचि आशा लावून कां फसवितां ? पहा,—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**चंद्र विकसी तो नील कमलिनीला ॥**
**सूर्य आनंदवि रक्त पंकजाला ॥**
**निग्रहाचे त पुरुष परस्त्रीला ॥**
**कधीं शिवती नच जरी प्राण गेला ॥**

**शार्ङ्गरवः**— अहो महाराज, इकडच्या रंगांत गुंग होऊन जर तुम्हीं पूर्वींचें वर्तमान अगदीं विसरलां तर तुह्मांला अधर्मभीरू असें कसें म्हणावें ?

**राजाः**— ( पुरोहितास ) गुरुमहाराज, आतां येथें निर्णय आपणच करावा. पहा,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**संशय येउनि मूढ मि होइन कथिल किं मिथ्या स्त्री ही॥**
**दारत्यागी होऊं किंवा सेवूं पराकांता ही ॥**
**निर्णय तुह्मि करा ॥ मजला यांतूनची तारा ॥**

**पुरोहितः**— (विचार करून) बरें तर, या प्रसंगीं असें झालें पाहिजे.

**राजाः**— कसें करायचें त्याची आज्ञा व्हावी.

**पुरोहितः**— ही बाई प्रसूत होईपर्यंत आमच्या घरीं राहू द्या.

कशाकरितां म्हणाल तर, आपल्याला प्रथमतः जो पुत्र होईल तो चक्रवर्तिलक्षणान्वित असेल असा महासिद्धांचा आपल्याला वर आहे; तेव्हां या मुनिकन्येचा पुत्र तशा लक्षणांनीं युक्त असा झाला तर हिचा आपण स्वीकार करावा; तसें न झालें तर हिनें आपल्या पित्याकडे जावें.

**राजा**:— आपण न्याय केला तो मला मान्य आहे.

**पुरोहित**:— मुली, चल मजबरोबर.

**शकुंतला**:— हे माते वसुंधरे, तूं तरी मला अनाथाला आपल्यां पोटांत घे ! ( रडत निघून जाते. )

[ तपस्वी, गौतमी आदिकरून जातांत. ]

**राजा**:— (शापानें स्मृतीला मोह पडल्यामुळें शकुंतलेविषयीं चिंतन करतो.)

( पडद्यांत ) " आश्चर्य हो आश्चर्य ! "

**राजा**:— काय बरें असेल हें ?

( पुरोहित प्रवेश करितो. )

**पुरोहित**:— राजा, फार अद्भुत चमत्कार घडून आला.

**राजा**:— असा कोणता अद्भुत चमत्कार महाराज ?

**पुरोहित**:— येथून ते कण्वशिष्य परत गेले तेव्हां ती बाई कपाळावर हात मारून, नशिबाला दोष लावून, हात वर करून, मोठ्यानें आक्रोश करूं लागली.

**राजा**:— बरें मग पुढें काय झालें ?

**पुरोहित**:— तों इतक्यांत अप्सरसतीर्थाजवळ एक विजेसारखी स्त्री चमकत अंतरिक्षांतून उतरली; आणि तिनें तिला उचलून नेलें.

( हें ऐकून सर्व आश्चर्यानें चकित होतात. )

**राजाः**— असें कांहीं तरी होईल म्हणून मला पूर्वींच तर्क आला होता. आतां त्याविषयीं विनाकारण विचार कशाला पाहिजे ? आपण आतां विश्रांति घेण्याकरतां जावें.

**पुरोहितः**— ( राजाकडे पाहून ) तुझा विजय असो.

[ असें म्हणून निघून जातो. ]

**राजाः**— वेत्रवतिके, मला आज भारी त्रास झाला आहे. तर शयनमंदिराकडे चल.

**वेत्रवतीः**— असें इकडून यावें महाराज. (असें म्हणून चालूं लागतात.)

**साकी** राग जोगी, ताल धुमाळी.

**घालविली मुनिदुहिता न सुचे लग्नवृत्त मज कांहीं ॥**
**सत्य सत्य हें परि या हृदया बहुतचि पीडा होई ॥**
**यास्तव मज वाटे ॥ नसावें तीचें वच खोटें ॥**

काय असेल तें असो.

( सर्व निघून जातात.)

**[ पांचवा अंक समाप्त. ]**

# अंक ६ वा.

## पांचव्या व सहाव्या अंकाच्या मधील प्रवेशक.

शहरचा कोतवाल, मुसक्या बांधलेला एक कैदी व
दोन शिपाई प्रवेश करतात.

**दोघे शिपाई:**— ( कैद्याला धक्काबुक्की करून ) अरे ए भामट्या, ःही आमच्या महाराजांची रत्नजडित अंगुठी तिच्यावर त्यांचें नांव कोरलं हाय ती तुला कुठंरे गवासली ? सांग सांग लवकर न्हाई तर बघ कशी गत व्हइल ती.

**कैदी:**— ( भयानें लटलट कांपून ) न्हाइगा दादा, तुमच्या पायाचान असलं वंगाळ काम करनार न्हव अमी.

**पहिला शिपाई:**— तर मंग तूं लई इद्वान बामन म्हनूनशेना सरकारनी दक्शना दिली व्हय ?

**कैदी:**— दादा, वाइच ऐकून तर घ्या. ह्ये बगा, मी सक्रावतारा-वरला मासे धरनारा कोळी हाये.

**दुसरा शिपाई:**— ए रामोशा, तुला का आम्ही तुझ जातवात इचारलं व्हय ?

**कोतवाल:**— सटव्या, त्याला त्याच्या बेतानें सांगूं दे सगळी हकीकत. त्याला मधेंच नको धमकी देऊं.

**दोघे शिपाई:**— जी साब, आपला हुकूम व्हइल तसं. सांगर सांग सम्दं ?

**कैदी:**— अन तिथ मी जाळीं टाकुनशेनी त्यावर आपलं प्वाट भरितों.

**कोतवालः**— वा ! धंदा तर मोठा चांगला करतोस, यांत कांहीं संशय नाहीं.

**कैदीः**— कोतवालसाब, असं कां ह्मनतां ? जो आपल्या वाडवडिलांनीं धंदा क्येला त्योच आपुनबी करतों त्यो वंगाल असला म्हणून सोडूं न्हाई. ह्ये बघा दादा, यग्न्यामंदी बामन बोकुड खाटकावानी मारत्याती ह्मणून काय त्येंचं मन निबार व्हत व्हय ?

**कोतवालः**— बरें तें राहूं दे. तुझा मजकूर तर सांग पाहूं आधीं ?

**कैदीः**— तंदी योक लई म्होटा रोहीं मासा माझ्या जाळयामंदी आला. त्यो म्यां कापला, अन् त्येच्या प्वोटांत ही चमाकदार अंगुठी गवसली; आन् मंग ती म्यां धुवूनशेनीं बाजारामंदी इकड तिकड दावीत फिरतोया, तेव्हां आपन सरकारानी माला धरलनं काय ? ह्योच काय तो खरा वरतांत. आपुन माझ डोक्स मारा का माला सोडून द्या; पन देवाच्यान मला अंगुठी अशी गवासली.

**कोतवालः**— जान्या, याच्या आंगाला माशाची दुर्गंधी येते आहे. हा रांडलेक मासे मारणारा खचित असावा, पण हा आंगठी दाखवीत फिरत होता याची नीट चवकशी केली पाहिजे, तर याला घेऊन आपण सरकारवाड्यांत जाऊं चला.

**शिपाईः**—भामट्या; चाल चाल पुढें. ( सगळे राजवाड्याकडे जातात.)

**कोतवालः**— सटव्या, याला देवडीवर बसवून त्याच्यावर चांगली नजर ठेव बरें. मी वाड्यांत जाऊन सरकारांना ही आंगठी दाखवून हिची सर्व हकीकत सांगून सरकारचा काय होईल तो हुकूम आतां घेऊन येतों.

**दोघे शिपाईः**— जी साब, याव आपुन फत्ते करूनशेनी. ( कोतवाल वाड्यांत जातो. )

**सटवाजीः**— ए जानबा, कोतवालसाहेब जाऊन वाढोळ झाला किर ?

**जानोजी**:— काय बिस्या, तुला ठाव न्हइ वाटतं ? आमचे सरकार का इकतच काम घेऊन बसल्यात ? मर्जी पाहुन्शेनी भ्येट व्हइल.

**सटवाजी**:— जानबा, माझ हात बघ कस सळसळत्यात. या भामस्याच्या गळ्यामंदी फुलाची माळ घालून याचं डोक्सं कवा उडविमंसं झालया. ( कैद्याकडे बघून हात उगारतो. )

**कैदी**:—दादा, माझं गरीबाचं डोक्सं फुकट कशापाई मारणार ? तुम्हासनी त्यामंदी काय मिळेल ?

**जानाजी**:— ( वाड्याकडे पाहून ) त्ये बघ रावसाब, सरकारचा हुकूम हातांत घेऊनशेनी इकडच येत्याती. लइ चांगलं बेस्या, तुला बघ, गिधाडं त्वोडत्वोडून टाकत्याल; न्हाइ तर कुत्र, कोलीं फाडफाडून खात्याल. ( कोतवाल येऊन म्हणता. ) सटव्या, या कोळ्याला सोडून द्यारे. यानें जी आंगठीची हकीकत सांगितली ती अगदीं खरी आहे.

**सटवाजी**:— जी साब, जसा आपला हुकूम.

**जानाजी**:— ह्येच बघा, म्हणत्यात तसा काळाच्या नरड्यांतून खरा बाह्येर आलाय जनु.

( कोळ्याच्या मुसक्या सोडतात. )

**कैदी**:— ( कोतवालास रामराम करून ) का रावसाब, मला आतां प्वोटाकरतां काइ हुकूम व्हइल का.

**कोतवाल**:— बाबा, तुला सोडला इतकेंच नाहीं; पण सरकारांनीं तुला आंगठीच्या किमती इतके रुपये पण बक्षीस दिले आहेत. ( कोळ्यास रुपये देतो. )

**कैदी**:— ( रामराम करून रुपये घेतो. ) रावसाब, सरकारांनीं माझ्यावर लइ म्हेरबानी केली.

**सटवाजी**:— याला म्हणत्यात म्हेरबानी. याचं डोक्सं जायचं त्ये सोडून अक्शी हत्तीवर बसवला.

**जानाजीः**—रावसाब, सरकारांनीं बक्शीस पन दिलं म्हनतां, तवां सरकारांना अंगुठी लइ ग्वाड वाटली वाटतं, व्हय ?

**कोतवालः**—अरे ती फार किंमतीची म्हणून सरकारला आवडली असें नाहीं; पण ती पाहिल्याबरोबर त्यांना एका प्रीतींतल्या माणसाची आठवण झाली आणि त्यामुळें ते जरी धीराचे आहेत तरी घटकाभर त्यांचाही गळा दाटून आला.

**सटवाजीः**— मग तर रावसाब, आपुन सरकारचं लई ह्मोट काम क्येलं म्हनायचं.

**जानाजीः**— गड्या रावसाबांनीं क्येलं कशाला म्हणतोस ? ह्या कोळणीच्या दादल्यानं क्येलं ह्मन.

( कोळ्याकडे वांकड्या डोळ्यानें पाहतो. )

**कोळीः**— दादानो बघा, आपुन मला फुलाची माळ घेनार व्हता; पन मचपुन फुल न्हाई पन फुलाची पाकळी घ्या.

**जानाजीः**— ह्यो लइ ठीक म्हनतोया.

**कोतवालः**— कोळीदादा, तर तुझी न् आमची आतां खूप खूप गडी जमली; तर पहिल्याच बैठकीला कांहीं तरी तोंड गोड झालं पाहिजे; तर चल आपण कलालाच्या दुकानीं जाऊं.

**सगळेः**— ह्योच ब्येत ब्येस बघा राव !

[ सगळे निघून जातात. ]

**हा प्रवेशक झाला.**

---

# अंक ६ वा.

( नंतर सानुमती नांवाची अप्सरा आकाशातून खालीं उतरते. )

**सानुमतीः—** अप्सरांच्या तीर्थाजवळ राहून सेवा करण्याचें जें आपलें काम तें तर आपण केलें आहे. आतां साधूंची व सगळ्या लोकांची स्नानाची वेळ आहे, तर मग तितक्या वेळांत आपण या राजाच्या नगरांत जाऊन, तिकडील वर्तमान कसें काय आहे तें डोळ्यांनीं पहावें म्हणजे झालें. खरेंच, मेनकेच्या स्नेहामुळें शकुंतले-विषयीं अगदीं परकेपणा वाटत नाहीं. ती माझीच असें झालें आहे; आणि मेनकेनेंही आपल्या मुलीकरतां हें काम करावें ह्मणून मला मागेंच सांगून ठेवलें आहे. ( खालीं उतरून इकडे तिकडे पाहून ) ह्या असल्या वसंतऋतूच्या वेळीं जिकडे तिकडे उत्साह असावा, तसें या राज-वाड्यांत कोठेंच कांहीं दिसत नाहीं, असें कां बरें व्हावें? हें मला अंतर्ज्ञा-नानें समजेल; पण तसें जर आपण केलें, तर आपल्या मैत्रिणीनें आप-ल्याला सांगितलें, त्या तिच्या सांगण्याचा मान राखल्यासारखें होणार नाहीं; तेव्हां तसें करणें योग्य नाहीं; तर मग या बागेंत या दोघी दासी करताहेत काय हें यांच्या मागून गुप्तरूपानें जावें म्हणजे सहज सगळें समजून येईल. ( आंब्याच्या मोहोराकडे पहात पहात एक बाग राखणारी दासी प्रवेश करिते; व तिच्या पाठोपाठ दुसरी येते. )

**पद**—इस तन धनकी कोण बऱ्हाई—या चालीवर.

राग सिंध, ता० दीपचंदी.

**सुखवि नयन किती ही आम्रकली ॥ थोडी तांबुस, हिरवी, धवली ॥ ध्रु०॥ वसंतऋतूचें जीवन तूं गे पाहुनि तुज मम वृत्तिहि धाली ॥१॥ खचित सांगतें दुसरें नाहीं तुजवीण मंगल या ऋतुकालीं ॥ २ ॥**

**दुसरी दासीः**— कायग परभृतिके, आपापल्यांतच काय पुटपुटत आहेस ती ?

**पहिली दासीः**— सखे मधुकरिके, या आम्रकलिकेला पाहून परभृतिका म्हणजे कोकिला उन्मत्त होतात, यांत नवल तें काय ?

**दुसरी दासीः**— ( गडबडीनें जाऊन तिला आलिंगून ) सखे खरेंच का वसंतऋतु लागला ?

**पहिली दासीः**— सखे मधुकरिके, खरेंच लागला बरें ! आतां गमतीनें चैनी करून विलास करण्याचे तुझे दिवस आले हे.

**दुसरी दासीः**— गडे, मी पायांवर उंच होऊन आंब्याचा मोहोर काढून कामदेवाची पूजा करतें; मीं पडेनाबिडेन म्हणून मला तूं अम्मळ सांवरून धर पाहूं.

**पहिली दासीः**— बरें, पण त्या पूजेचें अर्धफल मला देण्याचें कबूल करशील तर, नाहींतर नाहीं.

**दुसरी दासीः**— अहाग वेडे ! हें का मी सांगायाला पाहिजे ? तुझा आणि माझा जीव एकच आहे, देह मात्र निराळा. ( असें म्हणून पहिलीच्या खांद्यावर हात टेंकून उंच होऊन मोहोर काढिते. ) सखे, जरी हा मोहोर अद्यापि चांगला फुलला नाहीं, तरी नखानें मीं तोडतांच घमघमाट सुटला आहे पहा. ( मोहोर अंजलींत घेऊन, नमस्कार करून, उभी राहून )–

**पद—**राग भूपाली, ताल धुमाळी.

विठाई माउली बाई माझि विठाई माउली, या चालीवर.

**आम्रमंजिरी तुला अर्पितें नमुनि मीनकेतुला ॥ ध्रु० ॥**
**निजधनु ओढुनी पहा कसा हा मन्मथ सरसावला ॥**
**आ० ॥ पांच बाण सोडी विरहिणिवर सहावा तूं हो भला ॥ आ० ॥**

( असें म्हणून ती मंजिरी झोंकून देते. )

( इतक्यांत रागावलेला कंचुकी एकदम प्रवेश करितो. )

**कंचुकीः**— कायग ए दांडगे, तूं शुद्धीवर नाहींस वाटतें ! अग महाराजांनीं या वसंतऋतूंतील सर्व उत्सव बंद केले असून, तूं आंब्याचा मोहोर काढतेस काय ?

( दोघी घाबरून थरथर कांपतात. )

**दोघी दासीः**— दादा, आम्हांकडून चूक झाली. आम्ही तुमच्या पायां पडतों. दादा, आम्हांला ही आज्ञा समजली नव्हती, म्हणून आमच्या हातून असें झालें.

**कंचुकीः**— काय ? तुम्हीं ही गोष्ट ऐकिली नाहीं म्हणतां ? तुम्हांला लाज नाहीं वाटत ? पहा, महाराजांची आज्ञा माणसांनीं तर काय, पण या ऋतूंत फुलणाऱ्या वृक्षांनीं, तसेंच त्यांवर राहणाऱ्या पक्ष्यांनीं सुद्धां पाळिली आहे. तुम्हांला दिसत नाहीं काय ? हें पहा,—

**पद**—राग कालंगडा, ताल धुमाळी.

**आजवरी नृपति बहु झाले ॥ परि यासम कोणिं न केलें॥**
**बहु आम्रवृक्ष हे फुलले ॥ परि अजुनी फल नच आलें॥**
**चा० ॥ मजला कांहीं वदवत नाहीं पहा कशी ही कोरांटी कलिका धरी ॥ फुल नये अजुनि तिजवरी ॥ कोकिला मौन ती वरी ॥ चाल ॥ वाटे मदन भिउनी तो गेला ॥ धनु अर्धे ओढुनि बसला ॥**

**दुसरी दासीः**— असें झालें यांत काय आश्चर्य ? महाराजांचा पराक्रम तसाच आहे.

**पहिली दासीः**— दादा, आम्हांला थोड्याच दिवसांपूर्वी महाराजांच्या मित्रावसु मेव्हण्यानीं सरकारच्या पायांपाशीं चाकरी करण्यास पाठविलें, तेव्हांपासून आम्हांला हें बागेंतलें काम सांगितलें असल्यामुळें महाराजांची नवीन आज्ञा आम्हांला समजली नाहीं.

**कंचुकीः**— बरें एकदां असें झालें तें झालें, पुनः कराल तर खबरदार.

**दुसरी दासीः**— दादा, महाराजांनीं कशाकरितां वसंतोत्सव बंद केले, हें आम्हांसारख्या गरीबांनीं ऐकण्यासारखें असेल तर सांगाच; आम्हांला तें ऐकण्याची भारीच इच्छा झाली आहे.

**सानुमतीः**— मनुष्यांना उत्सव म्हणजे फारच प्रिय असतात; आणि या राजानें तर ते बंद करून सोडले, तेव्हां कारणही तसेंच मोठें असलें पाहिजे.

**कंचुकीः**—ही गोष्ट आबालवृद्धांस देखील समजली आहे; मग तुम्हांला सांगण्यास काय हरकत आहे? शकुंतलेचा अपमान करून महाराजांनीं तिला घालवून दिली हें वर्तमान तुमच्या कानीं नाहीं आलें?

**पहिली दासीः**—होय, सरकारच्या दृष्टीस पुनः ती आंगठी पडली; येथपर्यंतचें वर्तमान कोतवालसाहेबांपासून आम्हांला समजलें आहे.

**कंचुकीः**— झालें तर मग, पुढची हकीकत काय थोडीच सांगायची उरली आहे. ऐका, जेव्हां आपल्याच नांवाची आपणच दिलेली आंगठी पुनः महाराजांच्या दृष्टीस पडली, तेव्हां त्यांना आठवण झाली कीं, आपण शकुंतलेशीं गुप्त रीतीनें विवाह केला होता खरा, व तिला विनाकारण घालवून दिली, हें सर्व स्मरल्यापासून महाराजांना पश्चात्ताप झाला आहे, व तेव्हांपासून त्यांची अशी अवस्था झाली आहे कीं—

**पद**—राग पिलु ताल धुमाळी.

उद्धवा शांतवन कर जा—या चालीवर.

**रमणीय वस्तु जरि बघती। बहु कंटाळुनिया जाती॥**
**नेहमिच्या सेवका हातीं॥ प्रेमें नच सेवा घेती॥**
**नच रात्रीं निद्रा ये ती॥ शय्येवर तळमळ करिती॥ चाल॥**
**मंदिरीं कधीं तरी जाती॥ भलतिलाचि भलतें वदती॥**
**मुनिकन्या राणिस म्हणती॥ मग लज्जाव्याकुळ होती॥**
**किती हाल वदूं भूपाचे॥ नच खळले अश्रू त्याचे॥ रम०॥**

**सानुमतीः**— हें ऐकून मला भारीच आनंद होतो आहे!

**कंचुकीः—** असा महाराजांना पश्चात्ताप झाला म्हणून त्यांनीं वसंतोत्सव बंद करून सोडला समजलांत ?

**दोघी दासीः—** सरकारांनीं जें केलें तें अगदीं बरोबर केलें.

( पडद्यांत ) असें इकडून यावें महाराज.

**कंचुकीः—** ( कान देऊन ) ही पहा स्वारी इकडेच आली, तर तुम्ही आपआपल्या कामास लागा चला.

( तदनंतर पश्चात्तापास योग्य असा पोषाख केलेला राजा, विदूषक आणि प्रतिहारी प्रवेश करितात. )

**कंचुकीः—** ( राजाकडे पाहून ) जे अति सुंदर असतात ते कोणत्याही अवस्थेंत असले तरी चांगलेच दिसतात. पहा, आमचे महाराज इतके उदास झाले आहेत तरी रमणीय दिसत आहेत—

**पद**—राग देस, ताल धुमाळी.

समज धर कांहीं अरे गड्या— या चालीवर.

**टाकिला यानें। यानें डौल पहिला। करीं धरी एकचि**
**वलयाला॥ दीर्घ बहु सोडी॥ सोडी श्वासाला। अधर**
**जो रक्त दिसे मळला॥ सदोदित कष्टी। कष्ट जागराला।**
**करी, नयनांत लाल झाला॥ हिरा जरि धरिला। धरिला**
**साणेला। चकाके फारचि दृष्टीला॥ तसा हा राजा॥**
**राजा कृश झाला॥ तरी नच दिसे कमी मजला॥**

**सानुमतीः—** ( राजाकडे पाहून ) अहाहा ! शकुंतलेचा यानें अपमान केला तरी तो विसरून, याच्याकरितां ती रात्रंदिवस झुरणीस लागली आहे तें अगदीं योग्य आहे. हा तसाच आहे खरा.

**राजाः—** ( शकुंतलेकडे ध्यान लागून गेलें असल्यामुळें हळूहळू चालून. )

**पद**—राग समाज, ताल धुमाळी.

उद्धवा तुम्ही निरोप सांगा आमुच्या हरिला सादरें—या चालीवर.

**हरिणाक्षी ती प्रिया माझी शकुंतला सति सुंदरी॥**
**किंचित होतें भाग्य म्हणोनी चालुनि आली एथवरी॥**

एकांतांतिल खुणा सखीनें जरि सांगुनियां बोधियलें ॥
तिजला पाहुनी दुष्ट हृदय हें त्या समयीं मूढचि झालें ॥
दैवगती किति विचित्र आहे ऐन वेळीं मन हें निजलें ॥
विरहदुःख भोगायास्तव हें सांप्रत जागृत कीं झालें ॥
चिंतामणि करिं आला असतां फेंकुनि घेतालि खापरी ॥
हरिणा० ॥

**सानुमती:—** माझ्या सखीचें नशीबच तसें म्हणून तुला अशी बुद्धि झाली ती.

**विदूषक:—** ( एकीकडे ) या राजश्रीला पुनः त्या शकुंतलारूप व्याधीनें घेरिलें. त्यावरलें रामबाण औषध याला कसें मिळणार हें कळत नाहीं.

**कंचुकी:—** ( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो. महाराज, बागेंतील व्यवस्था जिकडे तिकडे बरोबर आहे, हें मीं जाऊन पाहिलें; आतां सरकारांनीं पाहिजे तिकडे जाऊन करमणूक करावी.

**राजा:—** वेत्रवतिके, आमच्या दिवाणजींस माझा असा निरोप जाऊन सांग कीं, काल साऱ्या रात्रभर मला झोंप न मिळाल्यानें आज कचेरींत येऊन न्याय निवडण्याचें काम होणार नाहीं, तर आपणच सगळीं कामें पहावीं व त्यांत एखादें भानगडीचें वाटलें तर तेवढेंच कागदावर लिहून माझ्याकडे पाहण्याला पाठवावें.

**प्रतिहारी:—** जशी महाराजांची आज्ञा. ( निघून जाते. )

**राजा:—** कंचुकी, तुम्हींही आपल्या कामास चला.

**कंचुकी:—** ठीक आहे महाराज. ( लवून मुजरा करून निघून जातो. )

**विदूषक:—** आपण येथें कोणाला टिकूं दिलें नाहीं तर त्या प्रमदवनांत तरी चला; म्हणजे तेथें थंडगार दाट छाया आहे, त्यानें घटकाभर तुमच्या जिवाला बरें वाटेल.

**राजा:—** मित्रा, काय सांगूं रे ? काळ फिरला आणि एक संकट

आलें ह्मणजे त्याच्या पाठोपाठ दुसरें संकट करें हात जोडून तयारं असतें; अशी जी ह्मण आहे, तीं अगदीं खरी आहे. पहा,—

**पद—** राग पिलु, ताल धुमाळी.
श्रावणांत पेरणी केली—या चालीवर.

**पाहिलें न मुनिकन्येला जें वाटत होतें मजला ॥ जिवलगा ॥**
**मुद्रिका पडे दृष्टीला ॥ तो मोह गळोनी गेला ॥ जिवलगा ॥**
**हें बघुनि छिद्र हृदयाला ॥ मदनानें काळ साधीला ॥ जिवलगा ॥**
**हा धरी । नेम मजवरी । बाण तो करी । आम्रमंजरीला ॥ कोण वारिल आतां याला ॥ जिव० ॥**

**विदूषकः**— घाबरूं नको; तुजवर त्या दुष्ट मदनानें आंब्याच्या मोहराचा बाण धरिला आहेना ? थांब त्या सगळ्या मोहराचा या दांडक्यानें नाश करून टाकितों. ( असें ह्मणून काठी उचलून मोहोर पाडूं लागतो. )

**राजाः**— ( हंसून ) अहो शूर, तुमचें ब्राह्मणपणाचें सामर्थ्य दिसून आलें मला. पण मित्रा, कोठें बसलें म्हणजे त्या माझ्या प्रियेसारख्या किंचित् दिसणाऱ्या या बागेंतल्या वेली माझ्या दृष्टीस पडून जिवाला करमणूक होईल बरें ?

**विदूषकः**— आपणच नाहीं का मघांशीं आपल्याजवळ असणाऱ्या चतुरिका दासीला सांगितलेंत कीं, मी या वेळीं त्या माधवीमंडपांत बसलों असेन, तेथें तूं माझी स्वतः काढिलेली शकुंतलेची तसबीर घेऊन ये म्हणून ?

**राजाः** —होय खरेंच, ती जागा तशीच मजेदार आहे; तर चल आपण तेथेंच जाऊं.

**विदूषकः**—या तर मग असे इकडून ( असें म्हणून दोघेही चालूं लागतात; सानुमतीही त्यांच्या मागून जाते.. )

**राजाः**— हा पहा, त्या मंडपामध्यें संगमरवरी दगडांचा चवथरा आहे. वर जाईच्या वेलांची कशी गर्द छाया आहे, जवळ फुकल पका-

रचे उपाहाराचे पदार्थ मांडिले असल्यानें हा मंडप आमचें आगतस्वागत करीत आहे कीं काय असें दिसतें. तर चल आंत बसूं ( दोघेही आंत जाऊन बसतात. )

**सानुमती:**— या वेलीच्या आडून माझ्या प्रियसखीची तसबीर कशी काय राजानें काढिली आहे ती पाहीन; म्हणजे तुझ्या नवऱ्याचें तुझ्यावर इतकें प्रेम आहे; असें शकुंतलेला सांगायला ठीक पडेल ( असें म्हणून वेलीआड उभी राहते. )

**राजा:**— मित्रा, मला आतां शकुंतलेबद्दलच्या एकूणएक गोष्टी आठवूं लागल्या. तिचा पहिला वृत्तांत तर सारा मीं तुला सांगितला होता ! पण मीं जेव्हां तिला घालवून दिली तेव्हां तूं माझ्याजवळ नव्हतास. बरें त्याच्या अगोदरही तूं तिची गोष्ट सुद्धां काढली नाहींस हें कसें काय ? का माझ्यासारखीच तुलाही भुरळ पडली ?

**विदूषक:**— मला कशाची भुरळबिरळ पडते ? पण पूर्वीं जेव्हां तूं तिची हकीकत सांगितलीस तेव्हां सरते शेवटीं काय सांगितलेंस " वदलों थट्टेनें तें सारें खरें न मानीं घरिं जा " मी काय ? मातीच्या ढेंकळासारखा जडबुद्धीचा, तेंच मी खरें समजलों अथवा होणार तें चुकावयाचें नाहीं हेंच खरें.

**सानुमती:**—होय बाबा, असेंच खरें.

**राजा:**— ( शकुंतलेचें चिंतन करून. ) गड्या, मला वांचीव रे वांचीव ?

**विदूषक:**— मित्रा, हें काय असें वेड्यासारखें करितोस ? तुझ्या सारख्या विचारी पुरुषाला हें शोभत नाहीं. अरे आकाश जरी कडकडून पडलें तरी धीराचे पुरुष धैर्य सोडीत नाहींत. काय, मोठी वावटळ सुटली म्हणून पर्वत डगमगतात ?

**राजा:**— मित्रा, तूं म्हणतोस तें सारें मला कळतें; पण काय करूं रे ? त्या प्राणप्रियेला मीं विनाकारण दुखविल्यामुळें ती अगदीं विव्हळ

होऊन तिची जी त्या वेळेस अवस्था झाली, तिची आठवण झाली म्हणजे माझें हें काळीज चरचर कांपतें रे ? पहा,—

**पद**--राग कालंकडा, ताल दादरा.

नमूं एकनाथपंत संत साधु भलारे–या चालीवर.

**माझें हृदय पोळत धैर्य गळत सर्व दिसत शून्य मला रे ॥ दैवबळें प्राप्त सुधाकुंभ मिं भंगीला ॥ ध्रु० माझें हृदय०॥ तूं नससी मम कांता असें वच वदतां रागें ॥ ते गुरुसम गुरुशिष्य तयापाठिं जाउं लागे ॥ मुनि दरडावुनि कथिति रहा एथ फीर मागें ॥ मग दीन नेत्रिं मजकडे बघे अश्रुच्या नियोगें ॥ मज रे, तोचि नेत्र टोचितसे, हृदयिं जसा भाला ॥ माझें हृदय० ॥**

**सानुमती**:— अगबाई, मनुष्याचा अप्पलपोटा स्वभाव किती तरी असतो हा ! पहा, या राजाला पश्चात्ताप होऊन संताप झाला आहे; पण तो पाहून मला आनंदच होत आहे.

**विदूषक**:— मित्रा, माझा तर्क असा वाहतो कीं, कोणी तरी आकाशांत संचार करणारानें तिला नेलें असावें.

**राजा**:— गड्या, त्या पतिव्रतेला स्पर्श करण्याची दुसऱ्याची काय छाती आहे ! तुझ्या त्या वहिनीची मेनका ही माता होय; तेव्हां तिच्या सख्यांतून कोणी तरी तिला नेलें असावें असें मला वाटतें.

**सानुमती**:— अशा या प्रेमळ पुरुषाला त्या माझ्या सखीविषयीं भ्रम कसा पडला असावा याचें जितकें आश्चर्य वाटतें, तितकें हा पुनः शुद्धीवर कसा आला याचें वाटत नाहीं.

**विदूषक**:— मित्रा, असें जर आहे तर व्यर्थ घाबरतोस कशाला ? आज नाहीं उद्यां कधीं तरी तिची गांठ पडेलच पडेल.

**राजा**:— हें कशावरून म्हणतोस ?

**विदूषक**:— हें बघ, आपल्या मुलीनें पतिवियोगांत झुरत असावें

हें आईबापांस कधींच आवडत नाहीं; तेव्हां तेच आपोआप तुझी आणि तिची गांठ घालतील.

**राजा:**— मित्रा, फिरून तें रत्न या दुर्दैव्याच्या दृष्टीस पडेल असें मनांत देखील आणूं नको ! अरे जें म्हणून मला सौख्य मिळालें त्याविषयीं असें वाटतें,—

**पद**—राग पिलु, ताल धुमाळी.

**दिसली मुनिकन्या ज्या कालीं ॥ कां स्वप्न असे त्या वेळीं ॥ किंवा भ्रमपटलीं मति लपली ॥ कीं पडलों मायाजालीं ॥ होती पुण्याई ती सरली ॥ पापाची पाळी आली ॥ वृत्ति सुखपर्वतिं जी चढली ॥ बघ तेथुनि ती ढासळली ॥ जागा न मिळे मज ती पहिली ॥ जरि तनु ही चरचर चिरली ॥**

**विदूषक:**— मित्रा, असा सिद्धांत करूं नकोस. अवश्य होणाऱ्या गोष्टी कधीं चुकावयाच्या नाहींत. ही आंगठीच पाहिनास; माशाच्या पोटांत गेली असतां पुन्हां सांपडली कीं नाहीं ?

**राजा:**— ( आंगठीकडे पाहून ) अरे मित्रा, या आंगठीला न मिळणारें असें स्थल मिळालें असतां, तेथूनही ही पडली, तेव्हां हीही शोकास्पदच आहे:—

**पद**—राग अलैया बिलावल, ताल दीपचंदी.

अहा हे कृष्णमुकुंदा या चालीवर.

**काय सखे मुद्रीके ॥ तव दैवाहि मजपरी होतें फुटक ॥ ॥ ध्रु० ॥ बसलिस अंगुलिवरतीं ॥ जेथें अरुणापरि नखें चमकत होतीं ॥ गळलिस तेथुनि परती ॥ तुज वाटली नच लज्जा कैसी ती ॥ घेउनि सावर हातीं ॥ तुज आवडलि कशी मग ती माती ॥ पडशिल कशि त्या हातीं ॥ आतां घेई मदाश्रुजलाचे घुटके ॥ काय सखे०॥**

**सानुमतीः**— ही आंगठी दुसऱ्याच्या हातीं जर गेली असती तर खरी शोकास्पद झाली असती.

**विदूषकः**— मित्रा, ही तुझें नांव कोरलेली आंगठी तूं कोणच्या उद्देशानें शकुंतलावहिनीच्या बोटांत घातली होतीस बरें ?

**सानुमतीः**— मलाही याच गोष्टीचा संशय होता; बरें झालें यानें विचारिलें तें.

**राजाः**— मित्रा, जेव्हां मी त्या तपोवनांतून इकडे नगरांत येण्याला निघालों त्या वेळीं त्या माझ्या लाडकीनें डोळ्यांत पाणी आणून विचारिलें कीं, मला आतां नगराला कधीं घेऊन जाल ?

**विदूषकः**— बरें मग ?

**राजाः**— नंतर ही आंगठी माझ्या बोटांतून काढून मीं तिच्या बोटांत घातली; आणि सांगितलें कीं,—

**साकी**–राग जोगी; ताल धुमाळी.

**मोजित जा प्रतिदिवशीं यांतिल एकाक्षर गे कांते ॥**
**जाशिल शेवटिं ते दिनिं येइल मज्जन तुज न्यायातें ॥**
**ऐसें बोलोनी ॥ केलें नच मी मागोनी ॥**

**सानुमतीः**— वा ! वेळ तर मोठी मजेची नेमिली होती; पण दैवानें मध्येंच घात केला !

**विदूषकः**— बरें पण ती आंगठी त्या कोळयानें धरलेल्या माशाच्या पोटांत कशी गेली ?

**राजाः**— अरे ती जेव्हां नगरास आली तेव्हां वाटेवर शचीतीर्थ लागतें तेथें वंदन करण्याकरितां गेली; त्या वेळीं ती आंगठी हातांतून गळून गंगेच्या ओघांत गेली.

**विदूषकः**— आतां सारें जुळलें.

**सानुमतीः**— म्हणूनच बरें, या अधर्मभीरु राजाला माझ्या सखीच्या लग्नाविषयीं संदेह उत्पन्न झाला; परंतु अशा प्रीतीला खुणेचा पदार्थ लागावा, हें कांहीं संभवत नाहीं.

**राजा**:— मित्रा, या आंगठीची घटकाभर निंदा केल्यावांचून मला चैन पडावयाचें नाहीं.

**विदूषकः**—( आपल्याशीं ) हे राजेश्री पुनः वेडयाच्या मार्गाला लागले असें दिसतें.

**राजा**:— ( आंगठीस ) अग सटवे,—

**दिंडी**– राग लीलांबरी, ताल दादरा.

**कोमलांगुलि शोभते ज्या कराला ॥**
**दिला सोडुनि उदकांत कां जिवाला ॥**

अथवा इला इतका दोष देणें बरोबर नाहीं.

**नाहिं पारख नच चेतना इयेसी ॥**
**ज्ञानवान मिं सोडिलें कां प्रियेसी ॥**

**विदूषकः**—( आपल्याशीं ) ह्यांना कल्पनेवर कल्पना कशा सुचत चालल्या आहेत ? पण आमचा तर इकडे भुकेनें प्राण चालला आहे.

**राजा**:—अगे प्रिये शकुंतले, कांहीं कारण नसतां तुझा मीं त्याग केला गे; सखे तुझ्या वियोगाग्नीच्या ज्वाला इतक्या भडकल्या आहेत कीं तेणेंकरून माझें हें कठिण हृदय पण कसें करपून चाललें गे. तर ये लवकर आणि दर्शन देऊन मला वांचीव !

[ इतक्यांत चतुरिका दासी हातांत शकुंतलेची तसबीर घेऊन येते. ]

**चतुरिका**:— ही शकुंतलाबाईसाहेबांची तसबीर. ( तसबीर दाखविते.)

**विदूषकः**— मित्रा; काय तुझी हुबेहूब चित्र काढण्याची कुशलता तरी ही ! अरे यांत भाव तरी कसे स्पष्ट दाखविले आहेस ! या उंच-सखल भागांवर माझी दृष्टि जणूं अडखळतेच.

**सानुमती**:— ( तसबीर पाहून ) काय या राजर्षीची कुशलता तरी ! मला वाटतें माझी सखीच माझ्यापुढें उभी आहे.

**राजा**:—

**साकी**– राग जोगी, ताल धुमाळी.

**काढाया मज नच आलें तें न्यून चित्रिं या दिसतें ॥**
**तथापि तीच्या लावण्याची थोडी छाया कळते ॥**

**सानुमती**:— काय सांगूं ! तुला मोठा पश्चात्ताप झाला आहे ! त्याला व तुझ्या अति लीन स्वभावाला जें योग्य तेंच बोलत आहेस.

**विदूषकः**— मित्रा, या पाटीवर तिघीजणी स्त्रिया दिसत आहित, तिघीही सुंदर स्वरूपाच्याच आहेत, तेव्हां यांत शकुंतलावहिनी त्या कोणच्या ?

**सानुमती**:— हा गांवढळ मनुष्य दिसतो. याला खऱ्या रूपाची परीक्षा कोठची ?

**राजा**:— बरें, तुला कोणती असावी असें वाटतें ?

**विदूषकः**— आपल्याला तर असें वाटतें. जिचे केश अस्ताव्यस्त झाल्यामुळें त्यांतून गुंफलेलीं फुलें गळत आहेत, जिच्या तोंडावर घामाचे बिंदु चमकत आहेत, जिचे बाहू अंमळ रुंदटसे दिसत असून, जी नुकतेंच पाणी घातलें असल्यानें ज्यांचीं पानें सतेज दिसत आहेत अशा आंब्याच्या झाडाला टेंकून उभी आहे, तीच शकुंतलावहिनी असावी; व दुसऱ्या दोघी तिच्या सख्या असाव्यात.

**राजा**:—चांगली परीक्षा केलीस तूं. माझीही तिला ओळखण्यांची एक खूण आहे. ती पहा—

**साकी**—राग पिलू– ताल धुमाळी.

**हस्ताचा तो घर्म लागुनि रेखा पुसकट दिसती ॥**

**रंगहि पुसला गालावरचा अश्रू गळुनि त्यावरतीं ॥**

तर चतुरिके जा, आणि माझा रंगाचा पेला व कलम घेऊन ये; म्हणजे यांत जें जें अझून कांहीं काढावयाचें उरलें आहे तें संपवून टाकूं.

**चतुरिकाः**— अहो, माधवभटजी, मी पेला आणि कलम घेऊन येतें; तोंपर्यंत आपण ही तसबीर संभाळा.

**राजा**:— तो कशाला ? आण ती इकडे, मीच संभाळतों माझ्या प्रियेला. ( तसबीर राजाच्या हातीं देऊन चतुरिका निघून जाते. )

**राजा**:— मित्रा, माझी काय विलक्षण तऱ्हा झाली पहा,—

**पद**—राग आनंदभैरवी, ताल दादरा.

काय मला भूल पडली, या चालीवर.

**दैवयोग ऊलटा कसा असे पहा ॥**
**मुख्य वस्तु टाकुनियां गौण सेवि हा ॥ ध्रु० ॥**
**मूर्तिमान सुंदरि ती एथ पातली ॥**
**क्रूर शब्द बोलुनि बाहेर घातली ॥**
**स्वच्छ गोड जलें पूर्ण नदी टाकिली ॥**
**मृगजल तें बघुनि भुलत तृषित मी अहा ॥ दैव०**

**विदूषक**:— ( आपल्याशीं ) खरोखरच यानें नदी सोडून मृगजलावर विश्वास ठेविला. ( उघड ) बरें मित्रा, आणखी या तसबिरींत काय काय काढावयाचें उरलें आहे ?

**सानुमती**:— माझ्या सखीच्या आवडत्या ज्या ज्या जागा असतील त्या त्या काढावयाच्या असतील वाटतें.

**राजा**:— काय काय काढावयाचें आहे ? ऐक,—

**अंजनीगीत.**

राग झिंजोटी, ताल सुमाळी.

' शुकचंचूंतुनी वृक्षाखालीं ' या चालीवर.

**जीचे पुलिनीं हंस लोळती । काढायाची मालिनि नदि ती ॥ हिमाचलाच्या पदनगपंक्ती । जेथ हरिण बसले ॥ १ ॥**
**वल्कें वाळातें ऐसे तरुवर । उभा एक खालीं मृग थोर ॥ घासितसे मृगि तच्छृंगावर । वामनेत्र आपुला ॥२॥**

**विदूषक**:— असें काय ? मी समजलों होतों कीं, लांबलांब दाढीचे असे ऋषींचे कळप काढून ही पाटी भरून टाकायची.

**राजा**:— मित्रा, माझ्या शकुंतलेचे प्रीतीचे अलंकार कांहीं काढायाचे विसरून राहिले आहेत.

**विदूषक**:— ते कोणचे ?

**राजाः**— तिच्या अति सुकुमारपणाला व वनवासाच्या स्थितीला शोभणारे असे:—

**दिंडी**–राग लीलांबरी, ताल दादरा.

**रुळति सुंदर केसरें ऐशिं गालीं ॥**
**फुलें शिरसांचीं कर्णीं नाहिं केलीं ॥**
**न काढीली स्तनदेशिं रहायाची ॥**
**धवलचंद्रापरि माळ मृणालांची ॥**

**विदूषकः**— ( घाबरला असें दाखवून ) मित्रा, या आमच्या वहिनी कोमल पल्लवाप्रमाणें नाजूक, आणि कमलाप्रमाणें आरक्त, अशा हातांनीं आपलें तोंड झांकून एकदम बिचकल्यासारख्या कां दिसतात बरें ? ( नीट रेखून पाहून ) हं समजलों, हा रांडलेक फुलांतील मध चोरणारा दुष्ट भुंगा तिच्या भोंवतीं घिरट्या घालून त्रास देत आहे.

**राजाः**— ( रागानें ) अरे, त्या दांडग्याला हांकून लाव.

**विदूषकः**— महाराज, दांडग्यांना शासन करण्याचा अधिकार आपल्याकडेच आहे.

**राजाः**— असें काय ? ठीक आहे. अगोदर सामोपचारानें सांगून पाहूं. अरे ए पुष्पित वेलीच्या पाव्हण्या, या माझ्या प्रियेच्या मुखावर उड्या घालून तुला काय मिळणार आहे ? तर ही पहा—

**पद**—राग काफी, ताल धुमाळी.

**वाट तुझी आदरें पाहते बघ रे ॥ ही भ्रमरी ॥ फार किं रे लागली तिला ती दिसते ॥ तान खरी ॥ गोड मधू सांचला दिसे परि नच ती पान करी ॥ भेट तिला एथ तें मिळे तुज काय तरी ॥**

**सानुमतीः**— इतकें सांगितल्यावर तो कसा जाणार नाहीं?

**विदूषकः**— मित्रा, भारी लोचट जात ही, घालविली तरी जायची नाहीं.

**राजा:**— ( डोळे वटारून ) कां रे, माझी आज्ञा ऐकत नाहींस होय ? ऐक तर,—

**पद**—राग जोगी, ताल धुमाळी.

जमका अजब तडाका बे, या चालीवर.

**माझें वच जरि नायकसी । तरि देईन या शिक्षेसीं ॥ध्रु०॥**
**मी अति नाजुक अधर सखीचा हळूचि प्यालों रति-**
**काळीं ॥ कमलगर्भि तुज बंदिवान मी करीन जरी त्या**
**शिवशी ॥**

**विदूषकः**— इतकी कडक शिक्षा देणार, असें त्याला समजल्यावर त्याची काय छाती आहे इथें रहाण्याची ? ( आपल्याशींच हंसून ) या राजश्रींना तर चांगलेंच वेड लागलें व मीही त्यांच्या संगतीनें त्यांच्याप्रमाणेंच होणार यांत संशय नाहीं. ( उघड ) मित्रा, ही खरी शकुंतलावहिनी नव्हे, हें चित्र आहे चित्र.

**राजा:**— ( दचकून ) काय, हें चित्र आहे !!

**सानुमती:**— मला देखील इतका वेळ हें सर्व खऱ्याप्रमाणें वाटत होतें, मग या राजाचें तर काय पुसायलाच नको ! याला या चित्रांतील सर्व भावांचा अनुभव असल्यानें याला खरा भास झाला यांत नवल काय आहे ?

**राजा:**— ( दीन स्वरानें ) मित्रा, केवळ वैऱ्याप्रमाणें या वेळेस केलेंस पहा,—

**पद**—राग जोगी ताल धुमाळी.

**उभि जवळ खरी ती बाला ॥ वाटलें असें चित्ताला ॥**
**सुखसागरीं जीव बुडाला ॥ विसरलों विरहवृत्तीला ॥**
चाल ॥ **सखया स्मृति देउनि मजला ॥ या समयाला ॥**
**घाताचि केला ॥ चित्रचि तूं केलें तिजला ॥ उभि जवळ ॥**

( असें म्हणून रडूं लागतो. )

**सानुमती:**— हा विरहाचा प्रकार कांहीं नवाच आहे. यांत पहिल्या कृतीला आणि पुढल्या कृतीला कांहींच मेळ दिसत नाहीं.

**राजा:**— मित्रा, असें झालें तर एकसारखें हें विरहदुःख मीं कसें सहन करावें बरें ?

**पद**—राग काफी, ताल दादरा.

( ऐकुनि विपरित वाणी । द्रौपदी दचकली मनीं—या चालीवर. )

**बघिन स्वप्निं जरि तिला ॥ न ये झोंप कधिं मला ॥**
**पडुनि चित्र दृष्टीला ॥ जरी करिन शांतीला ॥**
**नयनिं अश्रुपूर वाहती ॥ दृष्टि असुनि व्यर्थ होती ॥**
**मार्ग खुंटला ॥ म्हणुनि जीव पोळला ॥**

**सानुमती:**— शकुंतलेचा अपमान करून तिला जें दुःख दिलेंस तें सर्व तूं धुऊन टाकिलेंस.

( चतुरिका प्रवेश करिते )

**चतुरिका:**— सरकार, रंगाचा पेला आणि कलम घेऊन मी इकडे येत होतें—

**राजा:**— बरें मग ?

**चतुरिका:**— इतक्यांत राणीसाहेब तरलिका दासीसहवर्तमान वाटेंत भेटल्या. त्यांनीं मजजवळील पेला व कलम बलात्कारानें काढून घेतलें; आणि म्हणाल्या कीं, मीच जाऊन महाराजांपाशीं तें देतें.

**विदुषक:**— बटकीचे पोरी, नशीबानें तूं बरी सुटून आलीस ?

**चतुरिका:**— त्या धांदलींत राणीसाहेबांच्या शालूचा पदर झाडाला अडकला तो तरलिका सोडवूं लागली, इतक्यांत मी जीव घेऊन पळून आलें.

**राजा:**— मित्रा, राणी इकडे येत आहे व ती मोठी मानी आहे. तेव्हां येवढी तसबीर तूं संभाळ.

**विदूषक:**— तसबीरच काय ? पण मलाही संभाळ असें कां म्हणे-

नास ? ( तसबीर घेऊन उठून ) मित्रा, तूं त्या अंतःपुरकालकुटांतून मोकळा झालास म्हणजे या बंगल्याच्या तिसऱ्या मजल्यावरील गच्चीवर मी बसलों असेन तेथें मला हांक मार. ( असें म्हणून पळत जातो. )

**सानुमतीः—** अगबाई, या राजाचें मन जरी दुसरीकडे गुंतलें आहे तरी हा पहिल्या बायकोचा किती तरी मान राखितो आहे ? आणि म्हटलें तर याचें मन कांहीं तेथें नाहीं.

[ तदनंतर हातांत पत्र घेऊन प्रतिहारी प्रवेश करिते. ]

**प्रतिहारीः—** महाराजांचा जयजयकार असो.

**राजाः—** वेत्रवतिके, तुला वाटेंत राणी भेटली काय ?

**प्रतिहारीः—** भेटल्या महाराज, पण सरकारी कामाचा कागद माझ्यापाशीं पहातांच परत निघून गेल्या.

**राजाः—** तशी शहाणीच आहे ती. कामकाजाच्या वेळीं आपण आड येऊं नये हें तिला चांगलें कळतें.

**प्रतिहारीः—** महाराज, दिवाणजींची विनंति आहे कीं, आज जामदारखान्याकडील शिल्लक मोजण्याचें काम फार असल्यामुळें सगळीं कामें पहायला झालें नाहीं; पण जें एकच काम राहिलें तें सरकारच्या पसंतीकरितां लिहून पाठविलें आहे. तें पाहून काय तो हुकूम व्हावा.

**राजाः—** आण पाहूं इकडे काय आहे तें. ( प्रतिहारी आणलेला कागद देते, तो वाचून ) काय आपल्या नगरांतला धनमित्र नांवाचा जहाजांचा व्यापारी घरीं येत असतां बुडाला ? आणि त्याला संतति नसल्यामुळें त्याचें सारें द्रव्य आपल्या जामदारखान्यांत जमा व्हावयाचें, असें दिवाणजींनीं कळविलें आहे. शिव शिव ! एकूण पोटीं संतान नसणें हें दुःखच आहे. बरें, पण तो फार श्रीमंत होता तेव्हां त्याला बायकाही पुष्कळ असतील, तर चौकशी करा बरें. त्यांच्यापैकीं कोणी गरोदर आहे काय म्हणून ?

**प्रतिहारीः**— सरकार, ती चौकशी केली तेव्हां असें समजलें कीं, त्याची बायको जी अयोध्येच्या नगरशेटजीची मुलगी तिला आठवा महिना लागला असून तिचें डोहाळजेवण नुकतेंच झालें आहे.

**राजाः**— असें असेल तर दिवाणजींना जाऊन सांग कीं आपल्या बापाच्या द्रव्यावर गर्भांतल्या मुलाची पूर्ण सत्ता असते असें शास्त्र आहे.

**प्रतिहारीः**— जी सरकार, ( असें म्हणून जाऊं लागते. )

**राजाः**— अग इकडे परत ये पाहूं.

**प्रतिहारीः**— ही आलें सरकार.

**राजाः**— कोणाला पोटीं संतान आहे किंवा नाहीं, ही तरी चौकशी कशाला पाहिजे ? आजपासून चोहींकडे अशी दवंडी पिटायला सांग कीं,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**मरुनि आप्त बंधूजन जे जे लोक अनाथचि होती ॥**
**तत्संरक्षण करावयाचें ओझें या दुष्यंतीं ॥**
**पातकि जन जे जे ॥ त्यांना वच हें नच माझें ॥**

**प्रतिहारीः**— होय सरकार, अशी दवंडी जरूर पिटविली पाहिजे. ( असें म्हणून पडद्यांत जाऊन फिरून प्रवेश करिते. ) सरकार ही दवंडी ऐकून योग्यकालीं पाऊस पडल्याप्रमाणें सर्व लोकांस आनंद झाला.

**राजाः**— ( मोठ्यानें सुस्कारा टाकून ) एकूण ज्या पुरुषाच्या पोटीं संतान नाहीं त्याची गति अशी होतेना ! ज्याचा तो मरण पावला म्हणजे त्याची सगळी संपत्ति एखाद्या परक्याच्या हातीं लागते ! झालें, मी मरण पावलों म्हणजे या पुरूवंशांतल्या राजलक्ष्मीची देखील भलत्याच ऋतूंत पेरलेल्या जमिनीप्रमाणें व्यवस्था होणार !

**प्रतिहारीः**— सरकार, असे अवलक्षणी शब्द आपण काय म्हणून उच्चारतां ?

**राजा:**— प्रत्यक्ष हातांत पुण्यफळ आलें असून मी त्याचा अव्हेर केला तेव्हां मला धिक्कार असो !

**सानुमती:**— खचित यानें शकुंतलेला मनांत आणून आपली निंदा करून घेतलीन ही.

**राजा:**— हाय हाय !—

**पद**—राग भीमपलासी, ताल धुमाळा.

गड्यांनो कृष्ण गडी आपुला—या चालीवर.

**सुकालीं भूमी पेरियली ॥ फलाशा महा मनीं धरिली ॥**
**तशी धर्मानें प्रिया वरिली ॥ दुरुक्ती बोलुनि घालविली ॥उप-**
**जुनि ऐशा ख्यातकुलीं ॥ प्रतिष्ठा सर्वहि लोपविली ॥ कलंकी**
**जाहलों मी ऐसा ॥ डाग लाविला शुद्ध वंशा ॥**

**सानुमती:**—तुझ्या संततीला आतां कांहीं धक्का लागावयाचा नाहीं.

**चतुरिका:**— ( प्रतिहारीच्या कानांत ) सखे, हें सावकाराचें वर्तमान ऐकिल्यापासून महाराजांना फार दुःख झालें आहे, तर त्यांचें समाधान करण्याकारितां गच्चीवरून माधवभटजींस तरी घेऊन ये जा.

**प्रतिहारी:**— होय, असेंच केलें पाहिजे. ( निघून जाते. )

**राजा:**— ( दुःखानें ) हाय हाय ! या दुष्यंताच्या पितरांना मोठा संशय पडला असेल.—

**पद**— राग आनंदभैरवी, ताल दीपचंदी.

इंथा हेण्णेनु—या कर्नाटकी चालीवर.

**स्वर्गीं सर्व पितर माझे ते असतील खिन्न मनें ॥ माझ्या**
**मागें सुखविल कोण तो तर्पण करुनी तिलांजलि दानानें॥**
**स्वर्गीं० ॥ ध्रु० वेदाविहित मार्गाचीं श्राद्धें नाहीं खचित**
**मिळतील म्हणोनी ॥ संततिविरहित जो मी त्याच्या,**
**अश्रुजलाचीं करोत कीं पानें ॥ स्वर्गीं० ॥**

( मोहून पडतो. )

**चतुरिका**:— ( घाबरून वारा घालून ) महाराज, सावध व्हा, सावध व्हा !

**सानुमती**:— अग बाई, दिवा असून मध्यें पडदा असल्याकारणानें हा अंधारापासून दुःख अनुभवीत आहे ना ? तर आतां याच्या प्रिय पत्नीची गांठ घालून याला त्या दुःखापासून सोडवूं काय ? अथवा नको. कारण अदिती माता शकुंतलेचें समाधान करीत असतां ह्मणाल्या कीं, यज्ञभागाविषयीं उत्सुक असे जे देव, ते असा चमत्कार करतील कीं लवकरच तो दुष्यंतराजा आपल्या धर्मपत्नीचा स्वीकार करील. तर गडबड करून उपयोग नाहीं; तेव्हां मीं इतका वेळ पाहिलेलें व ऐकिलेलें वर्तमान माझ्या त्या प्रियसखी शकुंतलेला सांगून तिचें समाधान करावें. ( असें ह्मणून निघून जाते. )

( पडद्यांत )

**विदुषक**:— अरे मेलोंरे मेलों !! या ब्राह्मणाचा जीव कोणी वांचवा.

**राजा**:— ( हळू हळू सावध होऊन कान देऊन ) अरे विदूषकाचा हा दीन शब्द ! ( रागानें ) कोण आहेरे तिकडे ?

( प्रतिहारी येते. )

**प्रतिहारी**:— सरकार, विदूषक मरतो आहे, तर त्याचा प्राण वांचवा.

**राजा**:— काय ? माझा मित्र मरतो ! त्याला मारणार कोण तो ?

**प्रतिहारी**:— कोणीं गुप्तरूपानें येऊन त्याला गच्चीवरून उचलून बंगल्याच्या शिखरावर नेलें आहे; मग काय भूतचेष्टा आहेत तें कळत नाहीं.

**राजा**:— ( उठून ) काय ? माझ्याही घरीं भूतचेष्टा होतात ? अथवा यांत काय नवल आहे—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**अधर्म होती किती स्वहस्तें प्रतिदिनिं हें कळण्याला ॥**
**कठिण असे मग लोकवर्तना शक्य न जाणायाला ॥**
**वागे कोण कसा ॥ समजे तें हा नृप कैसा ॥**

**विदूषकः**—( पडद्यांत ) मित्रा मरतोंरे मरतों ! तर मला वांचीव.

**राजाः**— ( अडखळत चालून ) मित्रा, भिऊं नको, भिऊं नको. ( पुनः पडद्यांत )

**विदूषकः**— अरे भिऊं नको कसा ? हा कोणी गुप्तरूपी माझी मान उलटी वांकवून उंसाप्रमाणें मोडीत आहे.

**राजाः**— ( डोळे वटारून ) अरे माझें धनुष्य आणा धनुष्य.

( हातांत धनुष्य घेऊन एक यवनी येते. )

**यवनीः**— सरकार, हें धनुष्य व हे हातमोजे.

**मातलीः**— ( पडद्यांत )

**ओंवी.**

**अभिनवरक्तपाना तानेला ॥**
**शार्दूल झडपी वनपशूला ॥**
**तैसें मीं धरिलें पहा तुजला ॥**
**येवो संरक्षणा दुष्यन्त तुझ्या ॥**

**राजाः**— ( बाणांसह धनुष्य घेऊन रागानें ) काय मला उद्देशून बोलतो आहे ? अरे प्रेत खाणाऱ्या पिशाच्चा, थांब; तुला नाहींसा करून टाकितों. ( धनुष्य सरसावून ) वेत्रवति, वरच्या जिन्याचा रस्ता दाखीव.

**प्रतिहारीः**— असें इकडून यावें महाराज—

( सर्व चालूं लागतात. )

**राजाः**— अरे येथें तर कोणी नाहीं.

**विदूषकः**— [ पडद्यांत ] ( दीनस्वरानें ) मित्रा तूं मला दिसतो आहेस आणि मीच तुला कसा दिसत नाहीं ? हाय हाय ! तर मग, मांजराच्या तोंडांत सांपडलेल्या उंदराप्रमाणें माझी अवस्था होणार !

**राजाः**— ( रागानें ) अरे गुप्त विद्येनें गर्व करणाऱ्या पिशाच्या, तूं घमेंडी करूं नकोस; मला जरी तूं दिसत नाहींस, तरी माझ्या बाणाला दिसशील. ( धनुष्य ओढून )

**ओंवी.**

**हा वधिल तुजची माझा बाण ॥**
**राखील दीन ब्राह्मणाचे प्राण ॥**
**हंस सोडूनि उदक जाण ॥**
**क्षीरचि जैसा भक्षितो ॥**

[ इतक्यांत मातलि प्रवेश करितो. ]

**मातलिः—**

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**निर्मि मघवा दनुज ते तव शराला ॥**
**भक्ष्य त्यावरि तूं ओढ धनु नृपाला ॥**
**मित्रवर्गी येतसे दयादृष्टी ॥**
**सज्जनाची कधिं नाहिं बाणवृष्टि ॥**

**राजाः**— (बाण काढून) अरे, हा इंद्राचा सारथी मातलि ! यावें यावें, फार चांगलें येणें केलेंत.

**विदूषकः**— ( ईर्षेनें ) वः ! ज्यांनीं आह्मांला यज्ञांतल्या पशूप्रमाणें मार दिला, त्यांचें हे राजश्री आगतस्वागत करीत आहेत!

**मातलिः**— ( हंसून ) महाराज, महेंद्रांनीं आपणाकडे मला कशा-करितां पाठविलें हें ऐकावें.

**राजाः**— माझें लक्ष्य आहे, सांगावें.

**मातलिः**— कालनेमि राक्षसांचा पुत्र दुर्जय म्हणून राक्षस आहे.

**राजाः**— हो, आहे. हें मी नारदाच्या तोंडून ऐकिलें आहे.

**मातलिः**—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**तव मित्राचा वैरी जो खल तन्मृत्यू तव हस्तीं ॥**
**रात्रीचें तम नष्ट कराया चंद्र शके न गभस्ती ॥**
**म्हणुनि महेंद्रानें ॥ पाचारिलें तुज सन्मानें ॥**

म्हणून आपण आतांच्या आतांच त्याला जिंकण्याकरितां इंद्राच्या रथावर बसून निघावें.

**राजाः—** हा जो महेंद्रानें मला सन्मान दिला तेणेंकरून मी धन्य झालों; परंतु आमच्या मित्राची तुम्हीं अशी काय दुर्दशा केलीत ती ?

**मातलिः—** तेंहि सांगतों ऐका. मी येथें आलों आणि पाहिलें तों आपण कांहीं कारणानें अगदीं विव्हल झालां आहां, असें माझ्या नजरेस पडतांच आपणाला कोप यावा या उद्देशानें तसें करणें भाग पडलें. कारण,—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**घांशितां तीं लांकडें उठे ज्वाला ॥**
**पन्नगातें चिडवितां करि फणेला ॥**
**विना आणितां तो क्षोभ मानवाला ॥**
**नच प्रकटति ते आत्ममहात्म्याला ॥**

**राजाः—** ( विदूषकाच्या कानांत ) मित्रा, महेंद्राची आज्ञा मोडतां कामा नये; तर ही हकीकत आमच्या दिवाणजींला सांगून असें कळवावें कीं,

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**संरक्षावी स्वबुद्धिनें तुह्मिं मम प्रजा ती सारी ॥**
**जोंवरि दुसऱ्या कामीं चढली मद्धनुची ही दोरी ॥**
**लोकां सुखवावें ॥ माझें यश नच मळवावें ॥**

**विदूषकः—** आपल्या आज्ञेप्रमाणें करितों. ( निघून जातो ).

**मातलिः—** महाराज या रथावर आरोहण करावें.

**राजाः—** ठीक आहे.

( सर्व जातात. )

**[ सहावा अंक समाप्त. ]**

---

# अंक ७ वा.

( तदनंतर राजा व मातलि रथांत बसून आकाशांतून उतरत आहेत असे प्रवेश करितात. )

**राजाः**— मातलि, मीं जरी महेंद्राचें काम सगळें पुरें केलें, तरी माझी पाठवणी करितांना त्यांनीं जो सन्मान केला, त्याचें स्मरण झालें म्हणजे इतका मान देण्याजोगें माझ्या हातून कांहींच झालें नाहीं असें वाटतें.

**मातलिः**— (हंसून) महाराज, आपण व महाराज देवेंद्र उभयतांही आपापल्या कृतीविषयीं असंतुष्टच आहांत. कसें म्हणाल तर पहा,—

**साकी**– राग जोगी; ताल धुमाळी.

**इंद्रें दिधला मान तुह्मां तो वाटे बहु निज कृतिला ।।**
**त्वत्कृत कार्या योग्य असा मीं मान तुह्मां नच दिधला ॥**
**ऐसें त्या वाटे । उदार दोघे तुह्मी मोठे ॥**

**राजाः**— छे, तुम्ही म्हणतां तसें नव्हे; मला निरोप देतांना त्यांनीं स्वप्नांत देखील न मिळणारा असा माझा सत्कार केला. सर्व देवांसमक्ष आपल्या अर्ध्या सिंहासनावर जागा देऊन,—

**दिंडी**– राग लीलांबरी, ताल दादरा.

**पारिजाताची होति कंठिं माला ॥**
**टपत होता जी पुत्र घ्यावयाला ॥**
**हास्य केलें नुसतेंचि बघुनि त्याला ॥**
**कंठिं माझ्या अर्पिता स्वयें झाला ॥**

**मातलिः**— आयुष्मन्, त्यांनीं असें केलें यांत काय नवल आहे ? आपल्याला यापेक्षां कांहीं जास्ती दिलें असतें तरी तें शोभलेंच असतें; कारण आपण त्यांची कामगिरी तशीच बजावली आहे. पहा,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**असुरांचें निर्बीजचि केलें सुरलोकीं दोघांनीं ॥**
**नरहरिच्या त्या नखांनीं किंवा सांप्रत तव बाणांनीं ॥**
**वदतां कां ऐसें ॥ न केलें कोणीं तुह्मांसरिसें ॥**

**राजाः**— पण यांत माझी काय तारीफ आहे ? हें सर्व माहात्म्य त्या महेंद्राचेंच होय. कारण,—

**पद**—राग पिलु, ताल धुमाळी.

**चाल**— बालगजानन सभेसी आला.

**लघु सेवक तो कठिण कार्यि जरि नांव मिळवी नामी॥ ख्याति तयाची काय असे तें प्रभुयश ये कामीं ॥ सूर्यानें रथिं साराथि केलें नसतें अरुणाला ॥ काय तयाच्या हस्तानें तम जातें नाशाला ॥**

**मातलि**— आपल्या स्वभावास योग्य तेंच भाषण आपण केलेंत. ( थोडें खालीं उतरून ) महाराज, इकडे पहावें, या स्वर्गलोकांत आपल्या यशाचें किती कौतुक चाललें आहे तें,–

**दिंडी**–राग लीलांबरी, ताल दादरा.

**सुरस्त्रीचे जे अंगराग उरती ॥**
**त्यानिं सुरतरुच्या सूक्ष्म सालिवरतीं ॥**
**तव यशाचीं तीं पदें रचुनि गाती ॥**
**देव आवडिनें पहा लिहित बसती ॥**

**राजाः**— मातलि, मागें आम्हीं याच वाटेनें गेलों; पण त्या वेळीं राक्षसांशीं युद्ध होणार या उत्सुकतेमुळें हा सर्व मार्ग मला नीट पहातां आला नाहीं; तर सांप्रत आम्ही कोणच्या वायूच्या मार्गांत आहों बरं?

**मातलिः**— ऐका,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**मंदाकिनिचा आश्रय फिरवी तेजोमय रविकिरणा ।**

**पडलें येथें वामन हरिचें तें तिसरें पदजाणा ॥**
**परिवह वायूचें ह्मणती स्थान हेंचि साचें ॥**

**राजाः**— अहो मातलि, ह्मणूनच बरें ! माझा अंतरात्मा या ठिकाणीं असा प्रसन्न झाला आहे. ( रथचक्रांकडे पाहून ) मला वाटतें आतां आपण मेघमंडलांत आलों.

**मातलिः**— हें कशावरून बरें जाणलेंत आपण ?

**राजाः**—

**पद**—राग झिंजोटी, ताल धुमाळी.

१ ल्या अंकांतील शुकचंचूंतुनि वृक्षांखालीं या चालीवर.

**रथचक्रांच्या दांतांतूनि । चातकपक्षी जाति उडोनी ॥**
**अश्वशरीरीं सौदामीनी । लखलखती कैशा ॥ १ ॥**
**पूर्ण जलानें जो का भरला । ऐसा मेघांचा ढग आला ॥**
**त्यावरुनी अमुचा रथ गेला । धांवा या भिजल्या ॥ २ ॥**

**मातलिः**— महाराज, एका क्षणांत आपण आपल्या सत्तेच्या भूमीवर उतराल.

**राजाः**— मातलि, आम्ही अति वेगानें उतरत आहों, यामुळें हा मनुष्यलोक किती आश्चर्यकारक दिसत आहे पहा—

**पद**—राग देसकार, ताल धुमाळी. भूपाळीच्या चालीवर.

**दिसतीं जों जों शैलाचीं हीं शिखरें स्पष्ट मला ॥**
**तों तों वाटे भूमिभाग हा जातो सखलाला ॥**
**चहूंकडे पानांचा नुसता पुंजचि जो दिसला ॥**
**शाखा दिसतां विरल तरु हे पडती दृष्टीला ॥**
**सर्व नद्या रेखांपरि होत्या येती व्यक्तीला ॥**
**वाटे जणू हा गोल मजपुढें उचलुनि कुणि अणिला ॥**

**मातलिः**— वः ! फार खुबीनें पाहिलेंत. ( आदरानें पाहून ) महाराज, ही पृथ्वी पहा किती रमणीय दिसत आहे ती ?

**राजाः**— अहो मातलि, ज्याचें एक टोंक पूर्व समुद्रांत व दुसरें पश्चिमसमुद्रांत बुडालें आहे व जो संध्याकाळच्या सुवर्ण मेघाप्रमाणें चमकत आहे, असा हा मोठा पर्वत दिसत आहे तो कोणता ?

**मातलिः**— हा गंधर्वांचा पर्वत, याला हेमकूट असें ह्मणतात. या ठिकाणीं तपश्चर्या करणारास सिद्धि सत्वर होते. पहावें,

**दिंडी**— राग लीलांबरी, ताल दादरा.

**स्वयंभू जो परमेष्ठि देव त्याचा ॥**
**पौत्र मारीच प्रजापती साचा ॥**
**सकल देवां दानवां जनक झाला ॥**
**पत्निसह तो कीं एथ करि तपाला ॥**

**राजाः**— तर मग अनायासानें भगवंतांचें दर्शनफल मिळणार; तें जाऊं देऊं नये; म्हणून त्या महर्षीला अभिवंदन करून मग जावें अशी माझी इच्छा आहे.

**मातलिः**— योग्य आहे. ( रथ खालीं नेतो. )

**राजाः**— ( आश्चर्यानें )

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**झाला नच चक्रांचा ध्वनि तो धुळही नाहिं उडाली ॥**
**गगनाच्या मार्गांतुनि हा रथ आला असतां खालीं ॥**
**स्पर्शे नच भूला ॥ ह्मणुनी वाटें नच आला ॥**

**मातलिः**— आपण व महेंद्र यांमध्यें जें अंतर तें येवढेंच आहे. आपला रथ जमिनीस लागतो, त्यांचा लागत नाहीं.

**राजाः**—मातलि, भगवान् मारीच ऋषीचा आश्रम तो कुठें आहे ?

**मातलिः**—

**पद**–राग ललितागौरी ताल धुमाळी.

**अर्धतनू वारुळीं बुडाली त्वचा फणीची उरीं ॥ असा जो उग्र तपा आचरी ॥ जीर्णलतांचें कडें होउनी कंठा**

**वेष्टन करी ॥ झाली शुष्क मान किति तरी ॥** चाल ॥
**बाहुटयावरी जो जटाभार लोंबतो ॥ त्यामधें पक्षिगण**
**घरें करुनि राहतो ॥ दृष्टिला स्थाणुपरि अचलचि जो**
**भासतो ॥** चाल ॥ **सूर्यावरती लाउनि दृष्टी हात उभारी**
**वरी ॥ असा जो ० ॥**

**राजाः**— असें खडतर तप करणाऱ्या त्या मुनीला नमस्कार असो.

**मातलिः**— ( रथ उभा करून ) महाराज, अदितिमातेनें आपल्या हातांनीं पाणी घालून वाढविलेल्या मंदारकवृक्षांच्या राईंत जो हा मारीचाश्रम दिसत आहे तेथें आपण येऊन पोंचलों.

**राजाः**— येथें येतांच मला अमृताच्या डोहांत बुडाल्याप्रमाणें वाटतें. काय हो मातलि ! हें स्थान स्वर्गापेक्षां रमणीय आहे.

**मातलिः**— महाराज, आतां आपण खालीं उतरावें.

**राजाः**— ( उतरून ) मातलि, तुम्ही कसें करणार आतां ?

**मातलिः**— मीं हा रथ अगदीं उभा केला आहे, तो आतां हलणार नाहीं; तेव्हां मलाही खालीं उतरण्यास कांहीं हरकत नाहीं. ( खालीं उतरून ) इकडून यावें महाराज. ( दोन पावलें चालून, ) या महर्षींचीं तप करण्याचीं स्थानें तरी पहा किती मजेदार आहेत तीं.

**राजाः**— हीं स्थानें पाहून मला भारीच आश्चर्य वाटतें; कारण,—

**पद**—राग पिलू– ताल धुमाळी.

**कल्पतरू हे जिकडे तिकडे असतां येथिल मुनी आनंदानें**
**वसती येथें वायूतें भक्षुनी॥ कनककमलरेणुनीं सुवासित**
**उदक असे या वनीं ॥ घेती केवळ संध्यादिक षट्क-**
**र्मांच्या साधनीं ॥** चाल ॥ **हे रत्नशिळेवरि ध्यान धरुनि**
**बैसती ॥ अप्सरासमूहीं संयमनें वागती ॥ लक्ष्मिच्या**
**घरीं हे वैराग्यचि सेविती** ॥चाल॥ **ज्याच्या प्राप्तीसाठीं**
**करिती तप ते दुसरे मुनी ॥ तें बहु येथें असुनी चाले**
**यांचें तप आजुनी ॥**

**मातलिः**— महाराज, थोरांची इच्छा नेहमीं वाढतच जाते. ( इकडे तिकडे हिंडून आकाशाकडे पाहून ) अहो वृद्ध शाकल्य, भगवान् मारीच-ऋषि काय करीत आहेत ? ( ऐकलेंसें करून ) काय ह्मटलेंत ? दाक्षायणी मातोश्रींनीं आपणास पतिव्रता स्त्रियांचे धर्म सांगावेत म्हणून प्रार्थना केल्यामुळें त्यांस ते महर्षि पत्नीसमुदायामध्यें सांगत बसले आहेत.

**राजाः**— ( कान देऊन ) अहो मातली, अशा मुनींचें दर्शन त्यांच्या फुरसतीप्रमाणें होत असतें; तर ते रिकामे होतपर्यंत आपण त्यांची वाट पाहूं.

**मातलिः**— ( राजास ) आपण या अशोकवृक्षाच्या छायेखालीं बसावें. आपण दर्शनाकरितां आलां आहां असें सांगण्याकरितां मी आंत जातों.

**राजाः**— ठीक आहे. ( झाडाखालीं उभा राहतो. )

**मातलिः**— महाराज, मी जातों तर ( असें ह्मणून निघून जातो. )

**राजाः**— ( सुचिन्ह झालेंसें दाखवून ) अरे, मला शुभ शकुन कां बरें होतात हे ?:—

**साकी**— राग पिलु, ताल धुमाळी.

**मनोरथांची तुटली आशा मग कां स्फुरतो बाहु ॥**
**पुण्यफलातें टाकुनि दिधलें उरलें दुःखचि साहूं ॥**

( पडद्यांत ) — कितीरे बाबा दांडगेपणा तुझा हा ? आपल्या जातिस्वभावावरच गेलासना शेवटीं ?

**राजाः**— ( कान देऊन ) अरे, दांडगेपणा असण्याची ही जागा नव्हे; मग कोण कुणाला निषेधपूर्वक सांगत आहे बरें ? ( जिकडून शब्द आला तिकडे पाहून, हंसून ) अरे ज्याच्या बरोबर दोन तपस्विनी आहेत असा मोठा पराक्रमी हा बालक कोण असावा बरें ?:—

**साकी—** राग जोगी, ताल धुमाळी.

**पीत असे जो सिंहशिशू त्या केस धरुनि ओढितसे ॥**
**तयासवें खेळावें ऐसें मनिं याच्या वागतसे ॥**
**अंकुर हा याचा ॥ वाटे मज बहु थोराचा ॥**

( तदनंतर वर्णन केल्याप्रमाणें दोन तपस्विनींनीं धरिलेला असा बालक प्रवेश करितो. )

**बालकः**— आ कलले ए सिंहाच्या पोलस्या, मला तुझे दांत मोजायाचे आहेत. नाहीं तल बघ कसं कलीन तें.

**पहिली तापसीः**— अरे, ए मेल्या दांडग्या, आम्ही आपल्या पोरासारखीं हीं जनावरें बाळगलीं आहेत; यांच्या कां तूं हात धुवून पाठीस लागला आहेस ? मेलें माणसांनीं जों जों बोलावें तों तों तुझ्या खोड्या अधिकच होत चालल्या आहेत. तुझें नांव सर्वदमन म्हणून जें ऋषींनीं ठेविलें आहे तें अगदीं तुझ्या गुणायोग्य आहे.

**राजाः**— काय बरें असेल ? या बालकाकडे पाहतांच मला माझ्या पोटच्या पुत्राकडे पाहिल्याबरोबर जसें प्रेम उत्पन्न व्हावें तसें कां बरें होत आहे ? अथवा मला मुळींच संतान नाहीं त्यामुळें असें वाटत असेल हेंच खरें.

**दुसरी तापसीः**— अरे सर्वदमना, या सिंहाच्या पोराला जर सोडलें नाहींस तर ती बघ याची आई सिंहीण तुझ्यावर कशी उडी घालील ती ! अग बाई !

**बालकः**— ( हंसून ) अबब ! अशानें केवधा पण मी भ्यालों ! ( तिला वेडावतो )

**राजाः**—

**दिंडी**—राग लीलांबरी, ताल दादरा.

**बघुनि बालक हें मला असें वाटे ॥**
**महातेजाचें बीज यांत दाटे ॥**

**अग्निच्या त्या ठिणगीस लांकडाची ॥**
**नाहिं पडली ती गांठ तेविं हाची ॥**

**पहिली तापसीः**— बाळा, या सिंहाच्या पोराला सोडून दे, म्हणजे मी तुला दुसरें कांहीं गमतीचें खेळायला देईन.

**बालकः**— दे तल दे आतां कुताय तें ? ( हात पसरतो )

**राजाः**— ( पसरलेला हात पाहून ) अरे वः, याच्या हातावर चक्रवर्ति लक्षणें दिसतात; हीं पहा,—

**पद**— राग परज, ताल त्रिताल

**आवडती वस्तू लोभानें ॥ पसरिला घ्यायालागिं हात किं यानें ॥ आव० ॥ ध्रु० ॥ सकल करांगुलिवर रेखा या दिसति किं सुविमल जालमिषानें ॥ आव० ॥ कमल सकाळीं किंचित फुलतां अविरलनवदल परि मी मानें ॥ आव० ॥**

**दुसरी तापसीः**— बाई सुव्रते, नुसत्या बोलण्यानें हा कांहीं ऐकायाचा नाहीं, तर माझ्या पर्णकुटिकेंत जा, आणि तो मार्कंडेयाचा रंगवलेला मातीचा मोर आहे कीं नाहीं, तो याला खेळायला आणून दे.

**पहिली तापसीः**— बरें आणतें. ( निघून जाते )

**बालकः**— तोंपल्यंत मी याच्या बलोबलच खेलेन, कद्धीं सोलायचा नाहीं. ( तापसीकडे पाहून हंसतो. )

**राजाः**— या खोडकर मुलाच्या चेष्टा पाहून मला भारीच आनंद होत आहेः—

**पद**—राग सिंध अथवा जिल्हा.

काना बनसिवालेनें घागरिया फोरिरे या चालीवर.

**निष्कारण हसतांना दिसती मुकुलदंत हे याचे ॥**
**सर्व वर्ण ते स्पष्ट न उमटती मधुर बोल ते ज्याचे ॥**

**ऐशा बाला अंकीं घेउनि रज त्याच्या अंगाचे ॥**
**लागुनि वसनें मळती ज्यांचीं तेचि धन्य दैवाचे ॥**

**दुसरी तापसीः—** छे बाई, हा मला कसचा आटपायला ! ( इकडे तिकडे पाहून ) आपल्या ऋषिकुमारांपैकीं कुणी इथें नाहीं का? (राजाकडे पाहून ) बाबा, तूं तरी अमळ इकडे ये पाहूं. हा मुलगा सिंहाच्या पोराला कसा लाथाबुक्यांनीं मारतो आहे, त्याला तेवढें सोडीव; माझें कांहीं हा अगदीं ऐकत नाहीं.

**राजाः—** ( मुलाजवळ जाऊन हंसून ) अरे ए महर्षिपुत्राः—

**दिंडी—** राग लीलांबरी ताल दादरा.

**कृष्णसर्पाचें पोर चंदनाला ॥**
**बसुनि त्यावारि आणितें लांछनाला ॥**
**तसें पीडुनि हे पशू स्वताताला ॥**
**तुझ्या जननें मग काय सौख्य त्याला ॥**

**दुसरी तापसीः—** बाबारे हा कांहीं ऋषीचा मुलगा नव्हे.

**राजाः—** याच्या आकृतीप्रमाणेंच याची कृति पाहून मलाही प्रथम तसेंच वाटलें होतें. परंतु हा येथें तपोवनांत आहे म्हणून याला मी ऋषिपुत्र म्हटलें. ( तिनें सांगितल्याप्रमाणें त्या सिंहाच्या पोराला सोडून मुलास जवळ घेऊन त्याच्या स्पर्शाचा सुखानुभव घेऊन आपल्याशींच )

**पद—**राग रामकली, ताल त्रिताल.

**स्पर्श मला याचा भुलवि किती ॥ लाडिवाळ बाल**
**कुलदीप होय कवणा समजेना खचित परी ॥**
**स्पर्श मला० ॥ ध्रु० ॥ जरि मज इतकें बहु सुख**
**झालें जन्म घेई मग पोटीं त्यास किती तरि**
**याच्या संगें तोष होत हें कळेना मज कीं ॥ स्प० ॥**

**दुसरी तापसी—** ( राजाकडे व मुलाकडे पाहून ) अगबाई, काय तरी आश्चर्य हें !

**राजा:—** अहो बाई, इतकें तुम्हांला काय आश्चर्य वाटलें ?

**दुसरी तापसी:—** अहो, या मुलाचा आणि तुमचा तोंडवळा अगदीं सारखा दिसतो; म्हणून मला इतकें नवल वाटलें. शिवाय तुमची आणि याची कांहीं ओळख नसतां तुमच्याजवळ कसा अगदीं मुकाट्यानें राहिला आहे.

**राजा:—** ( मुलाचे मुके घेऊन ) अहो बाई, हा ऋषिपुत्र नव्हे म्हणतां तर याचें कुल तरी कोणचें ?

**दुसरी तापसी:—** हा पुरुवंशांतला आहे.

**राजा:—** ( आपल्याशीं ) काय ? माझ्याच वंशांतला आहे ? म्हणूनच बरें माझी आणि याची आकृति अगदीं सारखी दिसते, असें या बाईनें म्हटलें. असेल बुवा ! आमच्या पुरुवंशांतल्या पुरुषांचें हें शेवटलें व्रतच आहे कीं,—

पद—राग हिंदोल, ताल त्रिवट.

**सुखभवनीं वसति ते क्षितिपती आधिं होउनी**
**॥ ध्रु० ॥ वसुमती पाळोनियां जन बहु तोषुनि ॥**
**तरुतळीं वसतीच पावनीं ॥ सुख० ॥**

( उघड ) पण काय हो बाई, या ठिकाणीं आपल्या सामर्थ्यानें येण्याची मनुष्याला शक्ति नाहीं, मग हा पुत्र येथें कसा आला बरें ?

**दुसरी तापसी:—** होय तें खरें; पण याची आई एका अप्सरेची कन्या असल्यामुळें तिच्या ओळखीनें ती या आश्रमांतच प्रसूत झाली.

**राजा:—** ( आपल्याशीं ) ही तर आशा उत्पन्न होण्याला दुसरी खूण पटत चालली. ( उघड ) बरें, याची आई कोणत्या राजर्षीची पत्नी ?

**दुसरी तापसी:—** आपली धर्मपत्नी सोडणाऱ्या त्या मेल्याचें नांव कुणीं तोंडावाटे घ्यावें ?

**राजा**:— ( आपल्याशीं ) ही कथा तर सारी मलाच येऊन चिकटूं पाहते. बरें, याच्या आईचें नांव तरी विचारून पाहूं; ( चिंतन करून ) अथवा परस्त्रीच्या नांवाविषयीं चौकशी करणें हें मोठें अन्यायाचें आहे.

( नंतर हातांत मातीच्या मोराचें चित्र घेऊन पहिली तापसी प्रवेश करिते. )

**पहिली तापसी**:—सर्वदमना, अरे सर्वदमना, हें पहा शकुंतलावण्य कसें आहे तें.

**बालकः**— ( पाहून ) काय ? माझी आई ? कुताय कुताय ? माझी आई ?

**पहिली तापसी**:—याचा सर्व ओढा आईकडे असल्यानें, नुसतीं सारखीं अक्षरें ऐकूनच हा गुलाम फसला.

**दुसरी तापसी**:—अरे बाळा, तुझी आई नव्हे; या मातीच्या मोराचा डौल कसा छानदार आहे तो बघ, असें म्हटलेंन् तिनें, समजलास ?

**राजा**:— ( आपल्याशीं ) काय ? याच्या आईचें नांव देखील शकुंतलाच ! अथवा नांवासारखीं नांवें पुष्कळ असतात. देवा, हें चारित्र मृगजलाप्रमाणें आशा लावून मला न फसवो म्हणजे झालें !

**बालकः**— मावशी, हा मोल मला भालीच आवलतो; ( मोर घेतो. )

**पहिली तापसी**:— ( पाहून घाबरून ) अगबाई ! याच्या मनगटांतला ताईत कुठें दिसत नाहीं !

**राजा**:— घाबरूं नका, सिंहाशीं धिंगामस्ती करीत होता त्यावेळीं त्याच्या हातांतून सुटून पडला वाटतें. ( ताईत उचलूं लागतो. )

**दोघी**:— हं हं ! तायताला हात लावूं नका ! ( तरी तें न ऐकतां राजा घेतो ) अगबाई ! घेतलाच यानें. ( दोघी उरावर हात घेऊन एकमेकींकडे पाहातात )

**राजा**:— अहो बाई, 'तायताला हात लावूं नका.' असें कां म्हटलेंत ?

**पहिली तापसीः**— ऐका महाराज! ही अपराजिता नांवाची वनस्पति; हा जेव्हां जन्मला तेव्हां याचें जातकर्म भगवान् मारीच ऋषींनीं केलें; आणि ती याच्या मनगटांत बांधली; आणि सांगितलें कीं, याच्या हातची ती जर सुटून पडली तर याच्या आईनें किंवा बापानें अथवा स्वतः यानें ती उचलावी.

**राजाः**— बरें कदाचित् दुसऱ्यानें उचलली तर?

**पहिली तापसीः**— ती त्याला सर्प होऊन दंश करील.

**राजाः**— बरें असा सर्प होऊन आजपर्यंत कुणाला दंश झाला आहे काय?

**दोघीः**— असें पुष्कळदां झालें आहे.

**राजाः**—( हर्षानें ) अहाहा! आज माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले.

( बालकास जवळ घेऊन मुके घेतो. )

**दुसरी तापसीः**— बाई सुव्रते, चल ये, हा सर्व वृत्तांत नियमांत गुंतलेल्या शकुंतलेस सांगूं चल. ( असें ह्मणून जातात. )

**बालकः**— अले सोल मला, मी आईकले जातों.

**राजाः**— ( प्रेमानें ) पुत्रा, मला देखील तुझ्या आईकडे घेऊन चल.

**बालकः**— पुत्त पुत्त ह्मंजे? तूं नव्हेस माझा बाप. माझा बाप दुष्यंत लाजा.

**राजाः**— या भांडण्यानेंच माझी खातरी झाली बाळा.

( नंतर वेणीची जटा झालेली शकुंतला प्रवेश करिते. )

**शकुंतलाः**— तायताचा साप व्हायचा तो झाला नाहीं; तेव्हां माझ्या फुटक्या नशिबानें त्याचाही गुण घालविला काय? अथवा सानुमतीनें तिकडचें मन पालटलें म्हणून सांगितलें होतें, तेव्हां तिकडचें येणें तर झालें नसेलना? बघावें तर खरें काय तें.

**राजा:—** ( शकुंतलेकडे पाहून ) हाय हाय ! तीच ही माझी प्राण-सखी शकुंतला;—

**पद—** राग भूपाळी ताल धुमाळी.

**मलिन वस्त्र परिधान करितसे उदास होवोनी ॥
सखी ही ॥ व्रतानियमाच्या कष्टें आली पांडुरता
वदनीं ॥ दुरुत्तरें बोलुनि घालविली तेव्हांपासोनी ॥
सखीनें ॥ घातालि नाहीं वेणि ह्मणोनि गेलो गुं-
तोनि ॥ निर्दय झालों मी इतुका परि मजला अठ-
वोनी ॥ सखीनें ॥ एक सतत विरहाचें व्रत तें
चालविलें कसुनी ॥**

**शकुंतला:—** ( पश्चात्तापानें निस्तेज झालेल्या राजाकडे पाहून ) अग-बाई, हे कांहीं प्राणनाथ नव्हेत; तर मग माझ्या लाडक्याच्या हातांत मंगलकारक ताईत असतां हा कोण मेला पापी पुरुष त्याच्या अंगाला स्पर्श करून त्याला विटाळीत आहे ?

**बालक:—** ( आईजवळ जाऊन ) आई कोण ग हा ? मला पुत्त पुत्त म्हणून मिठी मालतो.

**राजा:—** प्राणसखे, जरी मीं तुझ्याशीं क्रूरपणाचें आचरण केलें तरी शेवट मोठा गोड झाला ! कारण मला तूं ओळखल्यामुळें माझी मला खूण पटली.

**शकुंतला:—** ( आपल्याशीं ) मना आतां धीर धर, धीर धर, घाबरूं नको. आजपर्यंत नशिबाची वांकडी नजर होती ती फिरून त्याची त्यालाच दया आल्यासारखें वाटतें. [ उघड ] अगबाई प्राणनाथ हे ! दुसरें कोणी नव्हे. ( एकमेकांस आलिंगितात. )

**राजा:—** प्रिये, ( तिच्या हनवटीस हात लावून )

**पद—**राग कालंगडा, ताल दादरा.

**तुझी स्मृति मजला होऊनियां मोह नष्टला गे ॥
सुमुखि सन्मुख तव आज वदनचंद्र देखिला गे ॥**

॥ चाल ॥ टळतां तो ग्रहणरोग ॥ व्हावा चंद्रासि
योग रोहिणिचा गे ॥ तुझी० ॥

**शाकुंतला:**— प्राणनाथांचा जयजयका— ( इतकें अर्धे बोलतांच गळा दाटून येतो व गप्प राहते. )

**राजा:**— सुंदरी,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

गहिंवर दाटुनि जयशब्द तुझा कंठीं जरि अडखळला ॥
विलासविरहित पाटलोष्ठमुख तव पडतां दृष्टीला ॥
झालों जयशाली ॥ चिंता कांहीं नच उरली ॥

**बालक:**— आई, कोण ग हे ?

**शाकुंतला:**— बाळा, आपल्या नशिबाला विचार.

**राजा:**— ( शकुंतलेच्या पायांवर डोकें ठेवून. )

**पद**— भूपाळी—राग भूपाळी, ताल धुमाळी.

सर्वहि सोड राग नच बरा ॥ मनिं या काळीं ॥ जाहलों
मदांध मी गे खरा ॥ दवडिली कामधेनु सुंदरा ॥ बघ
त्या वेळीं ॥ ध्रु० ॥ येतां चालत सुख तें घरा ॥ लिहिलें
भाळीं ॥ इच्छा अशीच होते नरा तमोदयकालीं ॥
वासित कुसुमांची सुंदरा ॥ माळ कपाळीं ॥ चाल ॥
। अंपडतध होत घाबरा ॥ फेंकी सर्प ह्मणुनि बावरा ॥
झाली तशि माझी गे तऱ्हा ॥ बघ त्या वेळीं ॥ सर्व० ॥

**शाकुंतला:**— प्राणनाथ, हें काय भलतेंच ? माझ्या का कोठें पायां पडावयाचें ? तेव्हां जें झालें त्याचा आपणाकडे काडीइतका देखील दोष नाहीं. मागल्या जन्मीं मींच काय पातक केलें होतें त्याचें फळ मला मिळालें तें. नाहीं तर हें मन किती दयाळू आहे हें मला ठाऊक

का नाहीं ? पण माझ्या कर्माप्रमाणें त्या वेळेस तसा निष्ठुरपणा आपणास आला तो. ( राजा उठतो. )

**शकुंतला**:— बरें प्राणनाथ, मजविषयीं इतका मोह पडला होता तो नाहींसा होऊन या हतभागिनीची आपणास कशी बरें आठवण झाली ?

**राजा**:— प्रिये, तुझा अपमान करून तुला दुखविल्याचें जें शल्य तुझ्या हृदयांत सलत आहे तें आधीं सर्व काढून टाकीन आणि मग सारें सांगेन. पहा—,

**पद**— कर्नाटकी रेगुप्ती, ताल दीपचंदी.

**पूर्वी अधरोष्ठावरि तूझ्या जी अश्रुधारा आली ॥**
**मोहव्याकूल होतों ह्मणुनि तिची उपेक्षा मीं केली॥**
**तो अश्रूचा बिंदू सखये दिसतो या पापणिखालीं॥**
**शेल्यानें आजि पुसुनी होइन दुःखमुक्त मी या कालीं ॥**

**शकुंतला**:— (हातांतील आंगठी पाहून) प्राणनाथ हीच ती आंगठी.

**राजा**:— प्रिये, ही आंगठी सांपडतांच तुझी मला आठवण झाली.

**शकुंतला**:— ह्या मेलीनें कांहीं बरें केलें नाहीं, ऐन खूण दाखवावयाच्या वेळीं ही नाहींशी झाली.

**राजा**:— सखे, ऋतूचा उदय झाल्याची खूण म्हणजे जसें वेलीला फूल येतें, तद्वत् तुझ्या आणि माझ्या भेटीची खूण ही आंगठी तूं घाल. ( आंगठी देऊं लागतो. )

**शकुंतला**:— मी ह्या मेलीवर पुनः कधीं विश्वास ठेवावयाची नाहीं. ती आपण घालावी.

( मातलि प्रवेश करितो. )

**मातलि**:— धर्मपत्नीची आणि कुलदीपक पुत्राची भेट झालेल्या महाराजांचा जयजयकार असो.

**राजाः**— खरेंच, माझ्या मनोरथांची गोड फळें मला मिळालीं. कायहो मातलि, हें सर्व वर्तमान महेंद्रांना कळलें असेल नाहीं ?

**मातलिः**— महाराज, ईश्वराला कळत नाहीं अशी गोष्ट कोणची ? आतां चलावें, आपणाला भगवान् मारीचऋषि दर्शन घेण्याकरितां बोलावीत आहेत.

**राजाः**— प्रिये, मुलाला कडेवर घेऊन चल. तुला पुढें करून भगवंताचें दर्शन घेऊं.

**शकुंतलाः**— हें काय ? मी नाहीं; आपणासह वडील माणसांपुढें जायला मला लाज वाटते.

**राजाः**— छे, या वेळीं लाजणें योग्य नाहीं; अशा मंगलकालीं तसेंच गेलें पाहिजे. चल तर ये. ( शकुंतला मुलास कडेवर घेऊन सर्व चालूं लागतात. )

( तदनंतर अदितीसहवर्तमान बसलेले मारीचऋषि प्रवेश करितात. )

**मारीचः**— ( राजाकडे पाहून अदितीस ) दाक्षायणि, हा पाहिलास का, आपल्या दर्शनाला कोण येत आहे तो ?,—

**पद**—राग लीलांबरी, ताल धुमाळी.

भला जन्म हा तुला लाधला, या चालीवर.

**तुझा तनय जो इंद्र तयाचा समरीं सेनापति ।**
**जया दुष्यंत लोक बोलती ॥ महापराक्रमि सकल**
**भूमिचा सार्वभौम हा पति । जयातें रिपु थरथर**
**कांपती ॥ यच्चापें वज्राचें कामचि संपवुनी**
**टाकिलें । हरितें भूषण करि आपुलें ॥**

**अदितिः**— त्याच्या स्वरूपावरूनच त्याचा पराक्रम स्पष्ट दिसत आहे.

**मातलि**:— आयुष्मन्, हे सकल देवांचे मातापितर प्रत्यक्ष आप· या पोटच्या मुलांप्रमाणें आपणाकडे पाहत आहेत, तर पुढें होऊन ;र्शन घ्यावें.

**राजा**:— अहाहा ! मातलि, हेंच नव्हे का ते;—

**पद**–राग ललित, ताल त्रिताल.

**तेजोमय रवि अवतरति ॥ ते द्वादशधा मुनि म्हणती ॥**
॥ चाल ॥ **जो त्रिभुवनपती मखभोक्ता एथुनि झाला**
**सुविमलकीर्ति ॥ ध्रु० ॥ मुनि दक्षमरीचोद्भव हे ॥ एकां·**
**तर विधि यां आहे ॥ तो नारायण निपजे यांपासुनि**
**घेऊनि वामनमूर्ति ॥**

**मातली**:— होय, हेंच खरें !

**राजा**:— महाराज, हा इंद्राचा सेवक दुष्यंत, उभयतांच्या चरणा· ;विंदीं प्रणिपात करीत आहे. ( नमस्कार करितो. )

**मारीच**:— वत्सा, चिरंजीव होऊन पृथ्वीचें पालन कर.

**शकुंतला**:— या मुलासहवर्तमान मी आपल्याला नमस्कार करितें.

**मारीच**:— मुली,—

**साकी**—राग जोगी, ताल धुमाळी.

**इंद्रापरि हा तव पति आहे पुत्र जयंतचि झाला ॥**
**आशिर्वाद तुज दुसरा योग्य न इंद्राणी पद तुजला ॥**
**देतों या काळीं । जागा दुसरी नच उरली ॥**

**अदिती**:— मुली, आपल्या नवऱ्याला अतिप्रिय हो, आणि हा ;ुझा मुलगा दीर्घायुषी होऊन आपल्या दोन्ही कुलांला सुख देवो. बसा सर्वे बसतात. )

**मारीच**:— ( एकेकाकडे बोट दाखवून )

**साकी**— राग जोगी, ताल धुमाळी.

**शकुंतला सति ही, हें सुंदर पुत्ररत्न, हा नृपती ॥**
**श्रद्धावित्तविधीपरि एके ठायीं सुदैवें जमती ॥**

**राजाः—** महाराज, आपल्या अनुग्रहाचा प्रकार कांहीं विलक्षणच आहे. कारण, अगोदर इच्छित वस्तूची प्राप्ति, नंतर आपलें दर्शन. पाहावें,—

**पद**—रागिणी भैरवि—ताल धुमाळी.

**आधिं होत फूल वृक्षाला ॥ मग येतें फळ तें त्याला ॥**
**ढग झांकिती आकाशाला ॥ मग करितो जलवृष्टिला ॥**
**क्रम ऐसा कारण कार्या ॥ तव मार्गीं आधीं फल आर्या ॥**

**मातलिः—** खरोखरच, थोरांचे प्रसाद असेच असतात.

**राजाः—** महाराज, ही आपली आज्ञाधारक शकुंतला, हिच्याशीं मीं गांधर्वविधिपूर्वक लग्न केलें, नंतर कांहीं दिवसांनीं हिच्या आप्तांनीं माझ्या घरीं हिला आणली असतां, मला विस्मरण होऊन हिचा मीं त्याग करून आपल्या गोत्रांतील जे कण्वमहामुनि त्यांचा मोठा अपराध केला; नंतर ही आंगठी माझ्या दृष्टीस पडतांच मागील सर्व गोष्टींचें मला स्मरण झालें, त्याचें भारीच आश्चर्य वाटत आहे. कसें म्हणाल तर,—

**दिंडी**—राग, लीलांबरी, ताल दादरा.

**दृष्टिदेखत हस्ति तो जसा जावा ॥**
**तयाविषयीं संदेह मनीं यावा ॥**
**स्मरण व्हावें पाउलें बघुनि त्याचीं ॥**
**तेंवि मोहं स्थिति होय मम मनाची ॥**

**मारीचः—** वत्सा, तूं अपराध केलास असें मनांत देखील आणूं नकोस, तुला संमोह देखील होणारा नव्हे; परंतु कसा झाला तें ऐक.

**राजाः—**माझें लक्ष्य आहे.

**मारीचः—** शक्रावतार क्षेत्रापासून अगदीं विव्हळ झालेल्या शकुंतलेस घेऊन मेनका दाक्षायणीकडे जेव्हां आली, तेव्हांच अंतर्दृष्टीनें मीं जाणलें कीं दुर्वासऋषीच्या शापामुळें तूं आपल्या धर्मपत्नीचा अपमान

केलास, विनाकारण केला नाहींस; आणि त्या शापाचा प्रभाव ती आंगठी तुझ्या दृष्टीस पडेपर्यंतच होता. त्याप्रमाणें तुला स्मरणही झालें.

**राजा:**— ( सुस्कारा टाकून ) भगवंता, आतां माझ्यावरला अपवाद टळला.

**शकुंतला:**— ( आपल्याशीं ) विनाकारण प्राणनाथांवर अपवाद आला होता; पण दैवानेंच तो नाहींसा केला. बरें, पण तसा शाप झाल्याचें मला कांहीं स्मरत नाहीं; परंतु त्या वेळीं वियोगदुःखामुळें माझें मन कोठें जाग्यावर होतें ? अथवा शाप झाला होता हेंच खरें. तसें नसतें तर त्या वेळीं माझ्या सख्यांनीं खुणेची गरज पडलीच तर ती आंगठी दाखीव असें सांगितलें नसतें.

**मारीच:**—मुली, तुझे हेतु सर्व पूर्ण झाले, तर तूं आपल्या पतीवर कोप करूं नको. पहा,—

पद—राग शंकराभरण ताल धुमाळी.

पांचव्या अंकांतील ‘ शाङ्गरवा मित्रा ’ या चालीवर

**शापानें तव पतिमति मोहित होती आजवरी ॥**
**जातां तें तम, तुझीच सत्ता आहे त्याजवरी ॥**
**आरशावरिंचा मल झाडुनियां धरितांच पुढारीं ॥**
**सुलभपणें जशि स्वच्छ दिसे ती छाया त्यांत खरी ॥**
**शापा० ॥**

**राजा:**— ( मुलास हातीं धरून ) महाराज माझ्या कुलाची प्रतिष्ठा ह्याजवर काय ती आहे.

**मारीच:**— तो कुलभूषण होऊन चक्रवर्तिपद मिळवील, पहा,—

**मोठी साकी.**

राग लीलांबरी, ताल धुमाळी,

**अप्रतिशर हा निष्प्रतिबंधें सागरिं रथ तारोनी ॥**
**सप्तद्वीपा सह ही पृथ्वी जिंकिल रिपु दंडोनी ॥**

**निजसामर्थ्यें येथिल हे पशु स्ववश करिल जाणोनि ॥**
चाल ॥ **सर्वदमन हें नाम पावला परि लोकांच्या भरणीं ॥ म्हणतिल भरत असें ॥ ऐसा बालक तव विलसे ॥**

**राजाः**— महाराज, याचे जातकर्मादिक संस्कार आपल्या हातून घडले आहेत तेव्हां तसें सर्व होणारच.

**अदितीः**— शकुंतलेचे सर्व हेतु पूर्ण झाले हें आनंदकारक वर्तमान कण्वऋषींना कळवावें हें बरें. हिची माता मेनका तर मजजवळ सेवेला आहेच.

**शकुंतलाः**— ( आपल्याशीं ) माझ्या मनांत होतें तेंच भगवतीनें सुचविलें.

**मारीचः**— तपश्चर्येच्या प्रभावानें सर्व त्यांना कळतेंच आहे.

**राजाः**— म्हणूनच बरें माझ्या अपराधाची त्यांनीं क्षमा केली ती.

**मारीचः**— तथापि आपल्याकडून त्यांना सांगून पाठवावें हें बरें; कोण आहे रे तिकडे ?

( शिष्य प्रवेश करितो. )

**शिष्यः**— भगवान्, काय आज्ञा आहे ?

**मारीचः**— गालवा, तूं आतांच्या आतां आकाशमार्गानें कण्वाश्रमास जाऊन कण्वऋषीला आनंदकारक वर्तमान असें सांग कीं, शापाची निवृत्ति होतांच पुत्रासहवर्तमान शकुंतलेचा स्वीकार दुष्यंत राजानें केला.

**शिष्यः**— गुरुवर्यांच्या आज्ञेप्रमाणें करितों. ( शिष्य निघून जातो. )

**मारीचः**— वत्सा, तूंही आपला मित्र जो इंद्र त्याच्या रथावर स्त्री-पुत्रासह आरोहण करून आपल्या राजधानीस जा.

**राजाः**— आज्ञा महाराज.

**मारीचः**— वत्सा,

साकी—राग जोगी, ताल धुमाळी.

**पर्जन्याची वृष्टि करोनी इंद्र सुखवु तव लोकां ॥**
**तूंहि महायज्ञीं सुर तर्पी तोषा एकामेकां ॥**
**ऐशा सुकृतींनीं ॥ चालो क्रम हा बहुत दिनीं ॥**

**राजा**:— आपल्या आज्ञेप्रमाणें करीन महाराज.

**मारीच**:— वत्सा, तुला आणखी कशाची इच्छा आहे ?

**राजा**:— आतां इच्छा कशाची उरली आहे ? तथापि भगवंताच्या मनांतून आणखी कांहीं द्यावयाचें असेल तर हें भरतवाक्य असो.

पद—राग शंकराभरण, ताल धुमाळी.

' आरती भुवनसुंदराची '—या चालीवर.

**व्हावे जगिं ऐसे नृपती ॥ जनहितास्तव जे बहु जपती ॥ ज्ञानी पंडित जे असती जय पावो तत्सरस्वती ॥** चाल ॥ **स्वयंभु शंभु महा शक्ती ॥ निरवु मम पुनर्जन्मसक्ती** ॥ चाल ॥ **सकल भवसिंधु ॥ होउ मज बिंदु ॥ अमोदिनि इंदु** ॥ चाल ॥ **तसा हृत्ताप हरुनि तारो ॥ बलवत्कविकृति जनिं पसरो ॥**

( सर्व निघून जातात. )

**सातवा अंक समाप्त.**



# भाषांतरकर्त्यांची प्रार्थना.



पद—राग गारा झिंजोटी, ताल दादरा.

'देवी श्री व्हिक्टोरिया' या चालीवर.

सुंदरमुख तुंदिलतनु नंदिकेश्वरा ॥
गिरिवरहिमनगजाधव इंदुशेखरा ॥ सुंदर० ॥ध्रु०॥

वृंदारकवृंदवंदितांघ्रि सुरवरा ॥
मंदाकिनिमंदबिंदुयुतजटाधरा ॥
सिंधुमथनहालाहाल नीलकंधरा ॥

देवा । धांवा । पावा । भवहरणा शिव शरणा-
गतभरणा हे दिगंबरा ॥ १ ॥

पंचवदन पंचभूतभस्मपंजरा ॥
पंचीकृतपंचतत्वसत्वमंदिरा ॥
पंचाननचर्म विपंचीरवादरा ॥

सदया । याया । समया । सरसरुनी झडकरुनी
कळकळुनी भेट शंकरा ॥ २ ॥ सुंदर० ॥

भ्यालों मी पाहुनि संसारसागरा ॥
कोठवरीं स्तवूं सांग पामरा नरा ॥
परवशता तिखट सुरी लागली उरा ॥

येईं । नेईं । पायीं । गुणवंता कुलवंता बलवंता
त्रिपुरहरहरा ॥ ३ ॥ सुंदर० ॥



सन १८८० सालीं आक्टोबर महिन्याच्या ३१ तारखेस पुणें येथील त्यावेळीं असलेल्या आनंदोद्भव नाटक-गृहांत शाकुंतल नाटकाचा संगीतांत ४ अंकांचा प्रथम प्रयोग झाला, त्या वेळेचीं

# प्रमुख पात्रें.



**सूत्रधारः**— कै. अण्णासाहेब किर्लोस्कर— ( क्लार्क द. भा. रे. कमिशनरचें आफीस. )

**पारिपार्श्वकः**— कै. १ नानासाहेब शेवडे– ( नाझर डि. कोर्ट सोलापूर ) कै. २ बाळकोबा नाटेकर, गवई.

**नटीः**— रा. गजानन बळवंत रेडे.

**दुष्यंतः**— कै. मोरोबा वाघुलीकर, गवई.

**सारथीः**— कै. केशवराव मायदेव ऊर्फ फौजदार [ क्लार्क इंजिनिअरचें आफीस. वाळेकर यांच्या हवेलींतून पडून मृत्यु पावले. ]

**शाकुंतलाः**— रा. मुजूमदार.

**प्रियंवदाः**— रा. ग. ब. रेडे.

**अनसूयाः**— कै. हरि दत्तात्रय रानडे– ( नि. श्रीमंत मिरजकर, )

**विदूषकः**— कै. गंगाधर भीमराव जांभेकर, बी. ए.( क्लार्क रे. क. आफीस. पुढें मामलेदार. )

**वैखानसः**— अण्णासाहेब किर्लोस्कर.

**रेवतकः**— कै. नानासा. सोमण–( रे. क. आफीस. पुढें हुजूर डे. कलेक्टर. )

**करभक सांडणीस्वारः—** कै. पुरुषोत्तम विष्णु गोडबोले, बी. ए.
( रे. क. आफीस पुढें बॉम्बे सेक्रेटरीएट)

**सेनापतिः—** नानासाहेब शेवडे.

**छत्र धरणारः—** कै. रामभाऊ ऊर्फ मामा मेहेंदळे–( रे. क. आफीस. )

**कण्वः—** बाळकोबा नाटेकर.

**शार्ङ्गरवः—** अण्णासाहेब किर्लोस्कर.

**शारद्वतः—** रा. विष्णु नारायण बुचके, क्लार्क लेव्हलिंगपार्टी. पेन्शनर,

नाट्यकलेचा मनु पालटण्याचा आरंभ वरील नाटकापासून वरील सुशिक्षित व वजनदार मंडळीच्या प्रत्यक्ष प्रोत्साहनानें झाला. व येथूनच नाट्यकलेचा वृक्ष फोफावूं लागला. इतिहास लिहिणारांस या माहितीचा उपयोग होण्यासारखा आहे, म्हणून ती मुद्दाम दिली आहे.

---